# नवा देव!

लघुकथांचा संग्रह

डॉ. अनंत वामन वर्टी

मूल्य : तीन रुपये

चंद्रहास प्रकाशन, नाशिक.

- प्रकाशक -

**चंद्रहास प्रकाशन**

वर्टी कॉलनी, नाशिक.



- मुद्रक -

**श्री. द. शं. पोतनीस**

गांवकरी मुद्रणालय, नाशिक.



- मुखपृष्ठ -

**प्रभा काटे**

मुखपृष्ठावरील चित्र

**'नवकथाकाराची हॅट'**

ह्या कथेंतील प्रसंगाचें आहे.







**श्रावण शुद्ध दशमी, शके १८७८**

**१५ ऑगस्ट १९५६**

# अ नु क्र म णि का





# नवा देव !

दुपारची वेळ होती. हवेंत बराच उष्मा होता. मनसुखच्या छोट्याशा दुकानात तर वाराहि विशेष येत नव्हता. दुकानाच्या आंतल्या बाजूस एका आरामखुर्चीवर मनसुख एक वर्तमानपत्र वांचत होता. ह्या वेळी दुकानात गिऱ्हाईकाची विशेष वर्दळ नसे. ही संधि साधून आरामखुर्चीत पडल्या पडल्या मनसुख एकदोन डुलक्या घेई. आताहि त्याचे डोळे सुस्तावले होते. त्यान गल्ल्यापाशी बसलेल्या आपल्या दुकानच्या नोकराकडे पाहिल. माडीमध्ये कुठल तरी रहस्यमालेच पुस्तक लपवल्यासारख धरून ते वाचण्यात तो मग्न झाला होता. मनसुखन एकदा अंगाला आळेपिळे दिले. मग त्यान वर्तमानपत्र आपल्या तोंडावर ठेवून दिल. थोड्याच वेळात त्यान डोळे मिटले.

त्याचा नुकताच कोठे डोळ्याला डोळा लागला असेल एक गोरागोरा, दिसायला सुंदर, राजबिंडा आणि हसतमुख असा माणूस त्याच्यासमोर येऊन उभा राहिला त्यान भारीपैकी कपडे परिधान केले होते. त्याच्याकडे पाहतांच पाहणारा क्षणार्धात त्याच्या अंकित होत असे. अशी काहीतरी विलक्षण जादू त्याच्या अंगात होती. तो हसत हसत मनसुखला म्हणाला,

" काय मनसुख ! कस काय चालल आहे ? "

" ठीक आहे ! " मनसुख म्हणाला, " पण आपण कोण ? "

" मला ओळखलं नाहीस तू ? " जरा आश्चर्यानं त्या तेजःपुंज माणसानं विचारलं, आणि तरीहि मनसुखच्या डोक्यांत काहीच प्रकाश पडलेला दिसून न आल्यामुळे तो म्हणाला, " मी सैतान ! "

" सैतान ? " आश्चर्यानं 'आ' वासून मनसुख उद्गारला आणि त्याच्याकडे पाहातच राहिला.

" होय ! " हसून सैतान म्हणाला.

" पण–पण– " मनसुख गोंधळून बोलू लागला, " मला वाटलं होतं तुझं रूप–तू काळाकुट्ट असशील, कुरूप असशील ! "

" हा हा हा ! " मोठ्यानं हसून सैतान म्हणाला , " तुम्ही मानवांनी माझी खूपच बदनामी करून ठेवली आहे. परमेश्वराची स्तुति करण्याच्या भरांत तुम्ही माझी निंदा करून ठेवली आहे. ज्याच्यावर मी प्रसन्न झालों नाही, त्यांनी माझ्याविषयी काय वाटेल ते लिहून ठेवलं आहे. " नंतर स्वत.शीच विचार करून किंचित् हसून सैतान म्हणाला, " आणि गंमतहि अशी की, माझ्या कृपेन ज्याची बरकत झाली आहे, असे लोकहि परमेश्वराचीच स्तुति करतात ! "

" पण तू इथं कशाला आलास ? " मनसुखनं विचारलं.

" मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. तुझा मित्र चिमणदास ह्याच्यावरहि मी प्रसन्न झालो आहे ! जरा माझ्याबरोबर येतोस का ? "

" कुठ ? कशाला ? "

" जरा चल तर खरा ! मला तुला कांही तरी दाखवायच आहे ! येतोस ? "

मनसुख म्हणाला, "चला, " आणि त्यानं आपल्या अंगात कोट चढविला. दोघंहि बाहेर येऊन एका भल्या मोठ्या मोटारीत बसले. मोटार हाकतां हाकतां सैतान म्हणाला, " तुझं वय काय ? "

" पस्तीस ! "

" बँकेत किती शिल्लक आहे ? "

" विशेषशी नाही ! "..

" इस्टेट वगैरे ? "

" कांही नाही. "

" तुझी बायको दागिन्यांकरता कधी तुझ्याकडे हट्ट धरत नाही का ? मुलं तुझ्याकडे कांही मागत नाहीत का ? श्रीमंतांच्या मुलांच्या चैनी पाहून आपणांसहि तसंच पाहिजे, असा हट्ट ते तुझ्याकडे धरत नाहीत का ? "

" धरतात. "

" मग तू त्यांच्या हौशी पुरवतोस ? "

" नाही ! " जरा खिन्न स्वरांत मनसुख म्हणाला, " माझ्याजवळ तेवढे पैसे नाहीत ! "

" मग तुला ह्याचं कधी वैषम्य वाटत नाही ? "

" वाटत ! पण करणार काय ? परमेश्वरानं माणसाला ज्या स्थितीत ठेवलं आहे, त्या स्थितीत राहिल पाहिजे ! "

" परमेश्वर ! " सैतान म्हणाला, " तुला एक सांगतो, आता ह्या जगावर परमेश्वराची सत्ता नाही ! माझी सत्ता आहे. माझ्या आदेशाप्रमाणं जे वागतात, त्यांच्यावर मी संपत्तीची, वैभवाची बरसात करतो. मनाचे जे खंबीर असतात, ते माझा सल्ला कृतीत उतरवतात, आणि श्रीमत होतात. मनसुख, आता काळ बदलला आहे. आता पैशाची देवता लक्ष्मी राहिलेली नाही. पैशाची देवता मी आहे- सैतान ! " बोलतां बोलता सैतानाला जरा आवेश चढला होता. तो पुढे म्हणाला, " म्हणे परमेश्वर ! जे मनाचे कमकुवत असतात, ज्याच्या अंगात धमक नसते, कर्तृत्व नसत, असे लोक आपलं अपयश, आपल्या मनाचा कमकुवतपणा लपविण्याकरता ' परमेश्वर ' ह्या शब्दाचा उपयोग करतात ! "

नंतर बराच वेळ कोणी काहीच बोललं नाही. मुबईच्या डांबरी रस्त्यांवरून मोटार भरधाव जात होती. थोड्याच वेळात मोटार वरळीच्या भागांत आली आणि एका भव्य प्रासादासमोर उभी राहिली. सैतान मोटारीतून खाली उतरला आणि त्यानं मनसुखला आपल्या पाठीमागे येण्यास खुणावलं.

बगल्याच्या भव्य प्रवेशद्वारातून आत शिरल्यावर एक मोठं आवार लागत होतं. त्यांत सुदर बगीचा होता.नंतर बंगल्याचं' पोर्च ' लागलं. ' पोर्च ' मध्ये एक अद्यावत मॉडेलची भली मोठी गाडी उभी होती. सैतान मनसुखला नंतर बगल्यांत घेऊन गेला. बंगल्यात मोठमोठी दालनं होती आणि तीं शोभेच्या वस्तूनी आणि सुदर फर्निचरनं सुसज्ज होती. कोच, खुर्च्या, नक्षीकाम केलेली टेबलं आणि मोठमोठी कपाट, मच्छरदाणीचे पलग ! – तें सारं सामान पाहून तर मनसुखचे डोळेच फिरले. आंतल्या एका खोलीत गेल्यावर सैतानानं एक मोठी तिजोरी उघडली. तिजोरीत सोन्याच्या विटा आणि जडजवाहिर होतं.

सारा बंगला पाहून झाल्यावर सैतानानं मनसुखला विचारलं, " हें पाहिजे तुला ? "

" काय ? " आश्चर्यानं मनसुखनं विचारलं.

" हा बंगला- ही तिजोरी- ही मोटार-नोकरचाकर- वैभव ! " सैतान म्हणाला.

मनसुखला सैतानाच्या बोलण्याचा अर्थच कळेना. तो गोंधळून उभा राहिला. तेव्हा सैतान म्हणाला, " हे सारं मी तुला देईन पण मी सांगेन तसं तू ऐकल पाहिजेस ! "

" काय सांगणार आहेस तू ? " मनसुखन विचारल.

" तुझ्या हिताचंच सांगणार आहे ! " सैतान म्हणाला, " ऐक. तू आता पस्तीस वर्षांचा झाला आहेस. तू आतापर्यंत बरेच धंदे केलेस. तरीपण तुझी स्थिति सध्या काय आहे ? कसाबसा तू आपल आणि आपल्या बायकोपोराच पोट भरू शकतोस ! नाही का ? "

" पण मी सचोटीन धदा करतों ! " मनसुख म्हणाला.

" आता आणखी दहापधरा वर्षात तुझ शरीर थकून जाईल. तुझी मुलं मोटी होतील त्याच्या शिक्षणाचा खर्च तुला केला पाहिजे.तुझ्या मुलीना चागली स्थळ शोधावी लागतील. तुझा ससार वाढतो आहे आणि उत्पन्न मात्र तोटकच आहे ! कस भागवणार आहेस त ? "

सैतानाचा हा प्रश्न ऐकून मनसुख निरुत्तर झाला. हे प्रश्न त्यालाहि भंडावत होते खरे ! त्याच्या ओठावर उत्तर आलं होत, " परमेश्वर आहे काळजी करणारा! " पण परमेश्वराच्या विषयीचे सैतानाच्या तोडचे जे शब्द त्यानं नुकतेच ऐकले होते, त्यामुळे त्याला ते वाक्य उच्चारण्याचा धीर झाला नाही.

तो काहीच बोलत नाही अस पाहून सैतान म्हणाला, " परमेश्वर, सचोटी, पाप, वगैरे भाकड कल्पनाच्या नादी लागून आतापर्यंत ज्या संध्या तुझ्याकडे चालून आल्या होत्या त्या तू फुकट दवडल्यास ! पण आता तरी तसला मूर्खपणा पुन्हा करू नकोस ! मी सागेन तसं वाग मग हा बंगला, हे वैभव, थोड्याच दिवसांत तुझ्या मालकीच होईल ! "

" मग काय करूं मी ! " मनसुखनं विचारलं.

" सध्या तुझ्या दुकानात एक भागीदार आहे ना ? "

" आहे ! रमणलाल त्याचं नांव. फारच सज्जन आहे तो ! अडचणीच्या वेळी त्यानं मला भाडवल पुरवलं आहे ! "

" नफ्यांतला निम्मा वाटा तू त्याला देतोस ना ? "

" तसा आमचा करार आहे. "

" लेखी ? "

" नाही—तोंडीच. आम्ही एवढे मित्र आहोत की आमचे सर्व व्यवहार तोंडीच आहेत. "

" आता नीट ऐक. तू जर नफ्यातला त्याचा हिस्सा त्याला पुरा दिला नाहीस, तर ते त्याच्या लक्षात येईल ?"

" नाही येणार. त्याचा माझ्यावर पूर्ण भरवसा आहे ! "

" मग तर फारच उत्तम ! " सैतान म्हणाला, " मग येत्या महिन्यापासून नफा त्याला देऊच नकोस ! त्यानं विचारलं तर सांग, अलीकडे दुकान नीट चालत नाही म्हणून ! "

" काय ? मी माझ्या मित्राला फसवू ? त्याचा केसानं गळा कापू ? " रागानं थरथरत मनसुख म्हणाला

" चिमणदासनं हेच केलं. आणि आता त्याची बँकेत पधरा हजाराची शिल्लक आहे ! "

" नाही,असा नीचपणा माझ्या हातून व्हायचा नाही ! " मनसुख ओरडला.

तो एकदम जागा झाला पाहिलं तर तो आपल्या आरामखुर्चीत होता तसाच होता त्याच्या अंगाला दरदरून घाम मात्र सुटला होता.

दोन तीन वर्षं अशीच निघून गेली मनसुखचं दुकान रुटूखुटू करत चाललं होतं. सारा दिवस राबून तो कसाबसा संसारापुरता मिळवत होता. संसार वाढत होता. पण त्याचं उत्पन्न मात्र वाढलं नव्हतं. त्याची बायको असंतुष्ट होती त्याची मुलंहि असंतुष्ट होती. पण मनसुख आपलं आयुष्य रेटत होता, दुकानचा हिशेब चोख ठेवत होता आणि रमणलालचा हिस्सा त्याला पोहोचता करीत होता.

दुपारची वेळ होती. नेहमीप्रमाणे मनसुख आरामखुर्चीवर पडला होता. पण आज तो दुःखात होता. त्याचा मित्र रमणलाल एका मोठ्या आजारानं नुकताच वारला होता. तो मरतांना मनसुख त्याच्या खाटेशी होता. रमणलालनं त्याचा हात हातांत घेऊन त्याला सांगितलं होतं, " मनसुख, आपण

लहानपणापासूनचे मित्र. एकमेकांच्या अडीअडचणीना उपयोगी पडलों. आता मी जातो. पण–पण–" आपल्या बायकोकडे अश्रूनी भरलेल्या डोळ्यांनी पाहात रमणलाल म्हणाला होता, " आता हिचा तूच सांभाळ कर. तू हिचा भाऊ आहेस ! "

" रमण, तू त्याची बिलकूल काळजी करूं नकोस ! " मनसुखनं आश्वासन दिलं होतं. " भावीला मी कांहीहि कमी पडू देणार नाही ! "

त्याला रमणलालविषयीचे एकएक प्रसंग आठवत होते. त्याचे डोळे पाण्यानं किंचित् ओलावले होते. विचार करता करतां त्यानं तोंडासमोर धरलेलं वर्तमानपत्र हळूहळू त्याच्या तोडावर पडलं. त्याचे हात खुर्चीच्या बाजूला पडले.

" काय मनसुख, काय हालहवाल आहे ? "

त्याला शब्द ऐकू आले, म्हणून त्यान दचकून त्या दिशेकडे पाहिलं. पाहातो तो सैतान समोर उभा !

" ठीक आहे ! " जरा त्रोटकपणानंच मनसुखनं उत्तर दिलं.

" बँकेंत किती जमा आहे ? " सैतानानं विचारलं.

" शून्य ! " मनसुख जरा चिडक्या स्वरांत म्हणाला.

" मीं सागितलं तसं तू केलेल दिसत नाही ?" सैतानानं विचारलं.

मनसुखनं निश्चयान नकारार्थी मान हलवली.

" मी सागतो तस वागण्यांत माणसाचा फायदाच असतो ! " सैतान म्हणाला, " चिमणदास पहा आता कसा श्रीमंत झालाय् ! पर्वाच त्यान शिवाजी पार्कला एक हवेशीर फ्लॅट भाड्यानं घेतला आहे. पांच हजार तर नुसती पागडी दिली त्यानं ! आपली मोटार बदलून नवी घेण्याचा त्याचा विचार चालू आहे आता ! "

" असू दे ! " एक सुस्कारा टाकून मनसुख म्हणाला, " त्याच नशीब त्याला हात देतंय् ! "

" नशीब ! " सैतान म्हणाला, " इतका कसा रे बावळट तूं, मनसुख ? नशीब बिशीब कांही नाही. फक्त मी सागतों तसं तो करतो. बस्स ! "

" पण तुझा सल्ला मला नाही पसंत पडत ! "

" मनसुख, असा वेडेपणा करूं नकोस ! आता तुझे केस पिकू लागले

आहेत. पैसा करायचा असेल, तर तुला आता थोडेच दिवस शिल्लक आहेत. मी सांगतों ते अजून तरी ऐक ! वरळीचा बंगला. --ती मोटार-ती तिजोरी! --"

" काय करायला सागतोस तू ? "

" विशेष काही नाही. सध्या तुझ्यापुढ एक उत्तम संधि चालून आली आहे ! ह्या सधीचा फायदा घेशील तर तू वरळीच्या रस्त्यान चालू लागला असं समज ! "

" पण मीं काय करायचं तें तर सांग. वरळीचा बंगला मला नको आहे असं थोडंच आहे ! "

" गोष्ट अगदी सोपी आहे. तुझा भागीदार रमणलाल नुकताच मेला आहे ना ? "

" होय ! "

" त्यानं तुला भाडवल दिलं होतं ना ? "

" होय ! "

" त्याची काही चिठ्ठीचपाटी आहे ? "

" नाही ! "

" मग त्यानं काही भाडवल दिलं नव्हतं असं सांग. हे सारं माझ्या मालकीच आहे असं जगाला सांग आणि आपल्या मालकीचं करून टाक ! "

" काय ? "

" रमणलालचा वारस कोण आहे ? "

" त्याची बायको-तिला मी नफ्यातला तिचा हिस्सा नियमितपणानं देणार आहें. आणि अखेर तिच भाडवलहि फेडणार आहें ! "

"मनसुख असा मुलखावेगळा वेडेपणा करू नकोस. जन्माचं सोनं होण्याची ही वेळ आहे. ह्या वेळी भावनांच्या आहारी जाऊ नकोस. मी सागतों ते ऐक. मनसुख, हे दुकान तर तू बळकावून बसच, पण उलट रमणलाल-कडून आपल्याला दहा हजारांच येण आहे, अशी त्याच्या बायकोवर फिर्याद कर ! "

" काय म्हणतोस तू ? "

" तुझ्या हिताचंच सागतो. पाहिजे तर बनावट कागद कर. पण ही सधि सोडू नकोस ! "

" आणि भावीला भिकेला लावू ? "

" तिचं काय होईल ह्याची काळजी तुला कशाला ? ती भिकेला लागेल

पण तुझी बायको सुखी होईल ! ह्या भांडवलावर तुला मोठा धंदा उभारतां येईल. सध्या लढाई चालू आहे.तिच्यांत तुझ्या दहा हजारांचे लाख व्हायला वेळ लागणार नाही ! लाखाचे दोन लाख - दोनाचे चार - फक्त एवढी साधी गोष्ट करायची ! "

मनसुखच्या मनाची थोडीशी चलबिचल झाली. मग तो एकदम भानावर आला. त्याला मृत्युशय्येवरचा रमणलाल आठवला. त्याचे मरतेवेळचे शब्द आठवले. क्षणकाल का होईना, आपल्या मनाची चलबिचल व्हावी याचा त्याला राग आला ही अधम गोष्ट करण्याचा सल्ला देणाऱ्या सैतानाचाहि त्याला राग आला तो सैतानाकडे पाहून एकदम ओरडला, " सैतान, चल जा, निघ इथून ! तुझ्या असल्या सल्ल्याची मला मुळीच जरूरी नाही ! "

सैतान स्वत शीच खिन्नपणानं हसला आणि निघून गेला.

आणखी चारपाच वर्षं गेली. लढाई संपून गेली होती, परंतु महागाई वाढतच होती. जनतेला युक्त्याप्रयुक्त्या करून कसं लुबाडावं ह्यांत व्यापारी वर्ग प्रविण झाला होता. दिवसेदिवस व्यापाऱ्यांना आपल्या जुन्या तिजोऱ्या अपुऱ्या पडू लागल्या होत्या पण मनसुख मात्र होता तसाच राहिला होता

त्याच दुकान होत तिथच राहिल होत त्यातला मालहि तेवढाच होता. बाजारावर मंदीची छाया पडू लागल्यामुळे त्याची विक्री जरा कमी झाली होती उलट घरमालकान त्याच्या दुकानाच भाड मात्र वाढवलं होतं.

मनसुख आता त्रासलेला दिसत होता. घरात बायको असंतुष्ट होती तिच्या बरोबरीच्या बायका आता सोन्यामोत्याच्या दागिन्यानी मढवून निघाल्या होत्या तिच्या अगावर मात्र फुटका मणीहि नव्हता तिच्या मैत्रीणीच्या मुलीची लग्न चागल्या श्रीमताच्या मुलाबरोबर होऊन गेली होती. तिच्या मुलीला मात्र तिच्या मनासारख स्थळ मिळत नव्हत. मनसुखची मुलहि असतुष्ट होती. त्याच्या बरोबरची मुलं झकपक कपडे करीत, नाटकसिनेमाना जात, मजा मारत. त्याची बिचाऱ्यांची कोटलीच हौस भागत नव्हती. घरांत बायकोची नेहमी कुरकुर चालत असे.

मनसुख अजूनहि त्या आरामखुर्चीवर रोज दुपारचा आराम करीत असे. त्याची ती आरामखुर्चीहि अजून बदललेली नव्हती. आरामखुर्चीत तोडासमोर वर्तमानपत्र घेऊन तो अजूनहि पेंगत असे. परंतु अलीकडे आरामखुर्चीत त्याला

आराम वाटत नसे. आरामखुर्चीवर येऊन तो पहुडला की निरनिराळे विचार त्याच्या मनात थैमान घालीत. घरांतली कुरकूर त्याला आठवे.आपल्या बरोबरचे जे लोक श्रीमंत झाले होते त्याची त्याला आठवण येई. मग त्याला शंका वाटे, आपल चुकल तर नाही ? सैतानान दिलेल्या सल्ल्याप्रमाण आपण वागलो असतों तर ? तर कदाचित् आपणहि आज श्रीमंतीत लोळत राहिलो असतो पण सैतानान सागितलेली कृत्यं किती भयंकर होती! कोठलाहि सुसस्कृत माणस ती करायला धजावला नसता ! पण इतरानी काय केल ? कसा पैसा केला ? चिमणदासनं काय केलं ? खुद्द भावाला फसवल. त्याच्या बायकोला देशोधडीला लावल ! आणि आज तो वैभवात लोळतो आहे ना ? पण त्याच्या मनाला समाधान असेल का ? की केलेली पाप त्याच्या मनाला टोचण्या देत असतील ? आपल्या मनाला तरी समाधान आहे का ? आहे! -- आहे ? नाही ! निश्चित सागता येत नाही – ,

" ओहो , मनमुख ? नुकतीच माझी आठवण काढली होतीस त ! हो ना ? "

मनसुखन समोर पाहिल त्याच्या कल्पनेप्रमाणे सैतान त्याच्या समोर हसतमुखानं उभा होता

" अ ? – होय ! "

" ठीक ठीक ! अखेरीस आता तरी शहाणपण सुचू लागलेल दिसतय् तुला ! "

" म्हणजे ? "

" मनसुख ! " आर्जवाच्या स्वरात सैतान म्हणाला, " आता तुला शेवटची सधि देतो आहे मी ! ही सधि जर तू वाया दवडलीस तर मात्र जन्मभर तुझ्या कपाळी दारिद्रचच लिहिलेल आहे ! पाहा, नीट विचार कर ! "

" काय करू मी ? "

" हे पहा, तुझ औषधाच दुकान आहेना ? मग अस कर तर "

" काय ? "

" सध्या विषमावरती नवीन निघालेल औषध दुर्मिळ झालं आहेना ? त्याच्या किमती भरमसाट वाढलेल्या आहेत ना ? "

" होय. एका बाटलीची किमत चारशे रुपये झाली आहे ! "

" मग तू त्या औषधाचा व्यापार का नाहीस करत ? "

" औषधच जर मिळत नाही तर व्यापार कसा करूं ? "

" अगदी भोळा आहेस तू, म्हणून तर असा ह्या दुकानांत खितपत पडला आहेस ! " जरा हसून सैतान म्हणाला, " अरे वेड्या, त्या औषधाचा व्यापार करायला ते औषध मिळालंच पाहिजे, असं थोडंच आहे ! आणि तें औषध जर सर्वांनाच मिळाल तर त्यावर तुला एकट्यालाच कसा नफा मारतां येईल ? "

" मला नाही कळला तुझ्या बोलण्याचा अर्थ ! "

" गोष्ट अगदी साधी आहे ! त्या औषधाच्या जुन्या बाटल्या गोळा कर. पाहिजे तर त्याच्यावर मूळ लेबलांप्रमाणे खोटी लेबलं छापून घेऊन चिकटवून दे. बाटल्यांत खडूची भुकटी भर, आणि अस्सल औषध म्हणून चारचारशे रुपयांना एकएक बाटली विक ! "

" खडूची भुकटी ? "

" होय, खडूची भुकटी ! नाहीतर खायचा सोडा घाल. पांच रुपयांच्या सोड्यांत तू पांचपचवीस हजार रुपये कमावशील ! "

" सैतान ! काय करायला सागतोस तू हें मला ? असं खोटं बनावट औषध विकून मी काय लोकांच्या प्राणाशी खेळू ? "

" त्यांत काय आहे ? सोडा बायकार्ब पोटांत गेल्यानं फायदा नाही झाला तरी नुकसान तर होणार नाहीना रोग्यांच ? "

" आणि परमेश्वरापाशी ह्या माझ्या पापाचा काय जबाब देऊं मी ? "

" काढलास पुन्हा परमेश्वर ? वेड्या, आता जगाचा सत्ताधारी मीच आहें. ह्या शतकात जी दोन महायुद्ध झाली, त्यात तुमच्या परमेश्वराचा पूर्ण पराभव झाला आहे ! आता मी – सैतान – परमेश्वर आहे ! माझी जे उपासना करतील, त्यांनाच बरकत होईल ! समजलास ? " सैतान म्हणाला, " अजून माझी उपासना कर ! पहा ! वरळीचा बंगला-मोटार-तिजोरी ! "

" सैतान ! चल निघ इथून, चालता हो ! " मनसुख ओरडला, " मी सारा जन्म दारिद्र्यात काढीन, पण असल रौरवांत नेणार पाप कधी करणार नाही ! "

सैताननं विकट हास्य केलं आणि तो अदृश्य झाला.

दोन चार दिवसांनी मनसुख असाच आरामखुर्चीत बसला होता. सैताना सांगितलेल पाप आपण केलं नाही, हें किती बरं झालं असा विचार तो करत होता. येवढ्यांत एक मोटार त्याच्या दुकानाशी येऊन उभी राहिली.

त्यानं पाहिलं तो मोटारीतून चिमणदासशेट उतरत होते. त्यांनी तिथूनच त्याला हाका मारल्या, "मनसुखभाय, अरे मनसुखभाय !"

मनसुख लगबगीनं दुकानाच्या दारापाशी गेला आणि त्यानं विचारलं, "काय चिमणदासशेट ?"

"अरे जरा माझ्याबरोबर चल पाहूं." ढेरी—हीहि त्याची मोटारबंगल्या-प्रमाणेच ह्या आठदहा वर्षातली कमाई होती ! – सावरीत चिमणदासशेट म्हणाले.

"तुमच्या घरी ? कशाला ?"

"अरे कशाला काय कशाला ? चल तर खर,माझा नवा बंगला दाखवतों तुला !"

जिमणदास शेटनी त्याला फार आग्रह केला. म्हणून मग कोट चढवून आणि नौकराला दुकानावर नीट लक्ष ठेवायला सागून मनसुख शेटजीच्या मोटारीत जाऊन बसला.

मोटारीन 'घू ऽऽ' असा कर्णमधुर आवाज केला आणि तिनं पळायला सुरवात केली. वाऱ्याच्या मद झुळुकी मोटारच्या खिडक्यातून आंत घुसून मन-सुखच्या शरीराला सुखवू लागल्या मोटारीत गाद्या तरी किती मऊ मऊ होत्या ! खरंच, मुबईतल्या दुपारच्या उष्म्याच्या वेळी मोटारीतून फिरण्यांत काय सुख आहे ! अस मनसुखला वाटलं.

मोटार जाता जाता वरळीला गेली आणि तिथल्या एका भव्य बंगल्याच्या आवारात शिरली. बंगल्याला भल मोठ पोर्च होतं, तिच्यात जाऊन ती उभी राहिली. मोटार थाबताच ड्रायव्हर पटकन खाली उतरला आणि मोटारचं मागील दार उघडून शेटलोकानी खाली उतरण्याची वाट पाहात तो उभा राहिला.

चिमणदास शेट मनसुखला बगल्यात घेऊन गेले. दिवाणखान्यांत हांतर-लेल्या मऊमऊ गालिच्यांवरून चालताना मनसुखच्या पायाना अपरिमित सुख होत होतं. चिमणदास शेटनी मनसुखला एका कोचावर बसवल आणि आपणहि त्याच्या शेजारी बसले. मग त्यांनी हिरे जडवलेली एक सिगारेट केस आपल्या खिशातून बाहेर काढली आणि ती उघडून मनसुखपुढे धरली. डबीतल्या सिगा-रेटना निर्देशून ते म्हणाले, "अस्सल इजीप्शियन तंबाखूच्या आहेत ह्या !"

मनसुख सिगारेट ओढत नव्हता. त्यानं शेटजींचे आभार मानले आणि तो कोचावर रेलून बसला.

समुद्रावरून येणारा गार वारा त्याला अतिशय आल्हादकारक वाटत होता.

शेटजी बसल्याबसल्या त्याला आपल्या कुटुंबाची हकीकत सांगत होते. त्याचा मोठा मुलगा इंग्लंडला जाणार होता एका गिरणीमालकाचा मुलगा त्याना जावई म्हणून मिळाला होता –

मग त्यानी त्याला चहा दिला. चहाबरोबर केकच्या फाका होत्या. त्यांना निर्देशून शेटजी म्हणाले, "मॉजिनीतून स्पेशल ऑर्डर देऊन बनवून आणली आहे ! "

चहा पिऊन झाल्यावर शेटजी म्हणाले, "चला, आता माझा बंगला दाखवतों. दोन लाखाला केला सौदा ! "

मनसुखला घेऊन शेटजी निरनिराळ्या खोल्यांतून फिरले. मग ते त्याला आपल्या झोपावयाच्या खोलीत घेऊन गेले. तिथ त्याची भली मोठी तिजोरी होती. ती त्यांनी उघडली. मनसुखनं आत डोकावून पाहिलं. तिजोरी सोन्याच्या चिपानी आणि दागदागिन्यानी भरलेली होती.

तिजोरी बंद करून शेटजींनी मनसुखला आपलं पितळेच्या गजांचं, शिसवीच्या लाकडाच मुद्दाम बनवून घेतलेल, नक्षीदार देवघर दाखवलं. देवघरात डाकोरजीची मूर्ति होती त्या देवघराला किती खर्च आला, त्याकरता खास गुजराथेतून सुतार कसे आणले होते, वगैरे माहिती शेटजी सांगत होते.

पण त्याच्या बोलण्याकडे मनसुखच लक्ष नव्हत.तो आपल्याच विचाराच्या तद्रीत होता मधा शेटजीच्या बगल्यात पाय ठेवल्यापासूनच आपण हे सार पूर्वी केव्हा तरी पाहिल आहे, ... .ती भली मोठी नवी मोटार, ते भव्य पोर्च,ते कोच, ते पलग, त्या गाद्यागिरद्या,ती तिजोरी आणि त्या सोन्याच्या विटा– सारसार आपल्या ओळखीच आहे, अस त्याला सारख वाटत होतं.

त्यानं डाकोरजीच्या तोंडाकडे पाहिल आणि त्याला आश्चर्य वाटलं. डाकोरजीचा चेहराहि त्याला ओळखीचा वाटला–चांगलाच ओळखीचा वाटला ! आपण तो चेहरा कुठं आणि केव्हा पाहिला आहे, हे त्याच्या लक्षांत आलं, आणि त्याच वेळी आपले गुबगुबीत हात जोडून चिमणदास शेटनी उच्चारलेले शब्द त्याच्या कानांवर येऊन पडले, "ही सारी डाकोरजीची कृपा ! "

● ● ●

# बलात्कार !

आज गावांतल्या साऱ्या शाळा ओस पडल्या होत्या. शाळांतून मुलं न आल्यामुळे मास्तरांनीहि शाळाना बुटीस दिली होती. कचेऱ्यातल्या कारकुनानी आपण आजारी असल्याच्या चिठ्ठ्या साहेबाना पाठवून दिल्या होत्या. दुकान-दारांनी दुकानं आपल्या नोकरांवरच सोपवली होती. पेन्शनरानी आपल्या रोजच्या वामकुक्षीच्या कार्यक्रमाला चाट दिली होती

आधीच बलात्काराचा खटला म्हटला म्हणजे कोर्टात गर्दी व्हावयाची. त्यांतून आजचा खटला तर विशेष मनोरंजक होता. एका सुशिक्षित तरुणीवर एका सुविद्य तरुणान बलात्कार केला होता आणि ह्या खटल्याला थोडस सामा-जिक महत्त्वहि प्राप्त झाल होत स्त्रियाना शिक्षण दिल की त्या वाहवणारच, अस गावातील सनातनी दुढ्ढाचार्य प्रतिपादन करू लागले होते, आणि ह्या सबबीखाली त्या खटल्याची रात्रंदिवस चर्चा करीत होते. सुधारक त्यावर टोमणे मारीत, " आम्ही नुसते शिकून उपयोगी नाही, तर आमच्यात खरोखरीच सुसस्कृतपणा यावयास पाहिजे ह्या सनातन्याची पुरुषप्रधान सस्कृति आमच्या हाडीमाशी इतकी भिनलेली आहे की, त्यावर शिक्षणाचाहि परिणाम होत नाही ! " आणि अस म्हणून ते हिरीरीन चर्चा करीत. वर्तमानपत्रानीहि आपल्या वाचकवर्गाची आवड लक्षात घेऊन ह्या खटल्याला बरीच प्रसिद्धि दिली होती. ह्या सगळ्या गोष्टीचा परिणाम म्हणूनच आज खटल्याच्या तारखेच्या दिवशी गावातील साऱ्या लोकानी भल्या पहाटेसच आपली जेवणखाणं उरकून घेतली होती आणि जेव्हा फटफटू लागल होतं, तेव्हा सारे नागरिक कोर्टाचा रस्ता चालू लागले होते.

कोर्टाचा दिवाणखाना तुडुंब भरून गेला होता आणि आवारातहि लोकांची झुंबड उडाली होती. कोर्टाचं काम सर्वांना नीट ऐकू यावं म्हणून ध्वनि-क्षेपकांची व्यवस्था करण्यांत यावी, अशा सूचनाहि कोर्टाच्या नाझराकडे गेल्या.

आजची फिर्यादी सुशिक्षित तरुणी अतिशय लावण्यवती आहे, अशी बातमी कांही माहितगाराकडून तिथं जमलेल्या लोकांत पसरली होती. आणि मग तर काय ? खटला केव्हा सुरू होतो, अस सर्वांना होऊन गेलं होतं.

अखेरीस कोर्टाची वेळ झाली. जज्जसाहेब नेहमी उशीरां येत पण आजच्या खटल्याच महत्त्व व त्यान लोकात उत्पन्न झालेली खळबळ लक्षांत घेऊन ते कोर्टाच्या वेळेच्या पाच मिनिट आधींच हजर झाले. काळा गाऊन घातलेल्या, पाढऱ्या केसांच्या, निर्विकार मुद्रेच्या त्याच्या धीरगंभीर मूर्तीन कोर्टांत प्रवेश करताच सर्वत्र 'शुक्शुक्' सुरू झाली आणि थोडक्याच वेळात कोर्टाचा दिवाणखाना शांत झाला. कोर्टाच्या बेलिफान पुकारा केला,

" नलिनीबाई देशपाडे हजर है ? नलिनीबाई देशपाडे ऽऽऽ – "

सर्वांचे डोळे दरवाजाकडे वळले. जिच्यावर बलात्कार करण्यात आला होता, ती शिकलेली आणि सौंदर्यवती तरुणी पाहण्याकरता प्रत्येकजण उत्सुक झाला होता. कोर्टाच्या त्या दिवाणखान्यात जमलेला प्रत्येक तरुण मान उंचावून आणि प्रत्येक वृद्ध चष्मा नीटनेटका करून श्वास निरोधून त्या स्त्रीची वाट पाहात होता. जणू आपल्या श्वासोच्छ्वासाच्या आवाजालादेखील बिचकून कदाचित् ती येणार नाही, अशी त्यांना भीति वाटत होती !

युगायुगाप्रमाणे वाटणारे दहापाच सेकंद गेले. दरवाजापाशी उभ्या असलेल्या बेलिफाची चर्या विस्मयचकित झालेली दिसली. किंचित् मागं सरून त्यानं त्या सौंदर्याच्या राणीला कोर्टांत येण्यास वाट करून दिली आणि एखाद्या राजहंसीप्रमाणे डौलदार पावलं टाकीत नलिनी देशपांडेन कोर्टांत प्रवेश केला.

सारी सभा मंत्रमुग्धाप्रमाणे तिच्या लावण्याकडे पहातच राहिली. म्हाताऱ्याच्या हनुवट्या त्यांच्या छातयावर पडल्या. तरुणानी हुरहुरीचे सुस्कारे टाकले. एवढे निर्विकार चेहऱ्याचे जज्जसाहेब, पण त्यांच्या कठोर चेहऱ्यावरदेखील मार्दव दिसू लागलं.कायद्याचा शाब्दिक कीस काढण्यात आनद मानणाऱ्या वकीलांनीदेखील आपल्या पगड्या सावरल्या.

नलिनी देशपाडे सुदर होती, सुरेख होती; जनतेनं निकाल दिला, वृद्ध कोर्टानंहि निकाल दिला. आरोपीच्या पिंजऱ्यांत उभ्या असलेल्या विश्वास पुणेकराकडे कांही तरुणानी हेव्याचे कटाक्ष फेकले. कांही तरुण पुटपुटले, " अशा सुदर तरुणीवर ह्याने बलात्कार केला, तर तो त्याचा मोठासा गुन्हा नाही ! "

खटल्याच्या कागदपत्रांवरून नजर फिरवून जज्जसाहेबांनी आरोपीला प्रश्न केला, " तुमचा वकील कोण आहे ? "

" मी वकील दिलेला नाही, महाराज. " तो तरुण अदबीनं उत्तरला.

जज्जसाहेबांनी त्याच्याकडे किंचितशा आश्चर्यानं एक कटाक्ष टाकला आणि त्यांनी आपल्या पुढल्या कामाला सुरवात केली. ते नलिनी देशपांडेला म्हणाले, " तुमची फिर्याद काय आहे ती मांडा. "

त्या तरुणीनं आपली फिर्याद एका कागदावर लिहूनच आणली होती. तिनं ती वाचून दाखविण्यास सुरुवात केली

" माझं नाव नलिनी देशपांडे. दोन वर्षांपूर्वी मी बी. ए. ची पदवी संपादन केली.घरची गरीबीची स्थिति असल्यामुळे मला एखादी नोकरी करणं भाग होतं. गेल्या चार महिन्यापासून ' वात्स्यायन लॅबोरेटरीज ' ची फिरती विक्रेती म्हणून मी काम करीत आहे.

" निरनिराळ्या औषधाच्या दुकानदारांच्या किंवा सद्गृहस्थाच्या भेटी घेऊन, त्यांना आमच्या लॅबोरेटरीजचा माल खपविणे, ही माझी कामगिरी आहे. त्याबद्दल मला प्रवासाचा भत्ता, बाहेरगावी राहण्याचा खर्च व महिना दोनशे रुपये असा मुशाहिरा मिळतो.

" साधारण महिन्यापूर्वी एका घरावर ' विश्वास पुणेकर एम् एस्सी. ' अशी पाटी पाहून औषधाची विक्री करण्याकरता मी त्या घरात शिरले. घरांत आरोपी एकटाच असावा. त्यानं माझं चांगल्या प्रकारे आदरातिथ्य केलं. त्याची वागणूक पूर्णपणे सभ्यपणाची होती. आमच्या लॅबोरेटरीजच्या औषधा-विषयी आमची मोकळेपणानं चर्चा चालली होती. निरनिराळ्या औषधांचे नमुनेहि पण मी आरोपीला दिले.

" आरोपीविषयी मला पूर्ण विश्वास वाटत होता, तो काही असभ्य-पणाची वर्तणूक करील अशी मला शंकाहि आली नव्हती. एवढ्यांत अंगात कांहीतरी संचारल्याप्रमाणे आरोपी आपल्या जागेवरचा उठला आणि त्याने माझ्यावर. . . माझ्यावर . . . . "

फिर्याद वाचतांवाचतां नलिनी थांबली. तिचे गाल लालबुंद झाले. तिची, जीभ अडखळू लागली. नंतर मोठ्या निर्धारानं तिनं कसेबसे शब्द उच्चारले " आणि त्याने माझ्यावर बलात्कार केला ! "

एवढं बोलून तिनं आपली देहलता एका खुर्चीवर टाकून दिली. आपल्या

पर्समधून थरथरत्या हातानं तिनं एक छोटासा रुमाल काढला, आणि त्यानं आपल्या कपाळावरचे घर्मबिंदु तिनं टिपून घेतले. तिचा चेहरा गोरामोरा दिसत होता. खरच, काय घडलं होतं हें ! तिची बेअब्रू झाली होती – तिच्या आयुष्याचा नाश झाला होता ! –

जज्जसाहेबानी आरोपी विश्वास पुणेकर ह्याला प्रश्न केला, " तुम्हांला गुन्हा कबूल आहे ? "

" होय महाराज, गुन्हा–जर तो गुन्हा असलाच तर–मला कबूल आहे ! " विश्वास पुणेकर म्हणाला.

" स्पष्ट बोला. "

" ह्या तरुणीवर मीं बलात्कार केला, हे सत्य आहे ! "

विश्वास पुणेकराचं हे भाषण ऐकून लोकाची निराशा झाली. त्यानं मुळातच वकील दिला नव्हता. त्यामुळे गावच्या वकीलापेक्षाहि लोकाचीच अधिक निराशा झाली होती. त्यातून आता तर सुरुवातीलाच त्यान आपल्यावरचा आरोप सरळ कबूल करून टाकला होता ! मग खटल्यात आता काय ' राम ' उरला ? जेव्हा आरोपीला गुन्हा नाकबूल असतो आणि त्याचा वकील फिर्यादी स्त्रीला आडवेतिडवे प्रश्न विचारतो, तेव्हाच बलात्काराच्या खटल्याला खरी रगत चढते. आणि ह्या खटल्यात तर काय ? वकीलहि नाही, आणि आरोपीलाहि गुन्हा कबूल आहे ! एवढ्या उत्सुकतेन खटला ऐकावयास आलेल्या जनताजनार्दनाचा हा प्रकार पाहून विरस झाला त्याना त्या भरात वाटल, आरोपीला कोर्टान चांगली सात वर्षाची सश्रम कारावासाची शिक्षा ठोठावावी !

" महाराज, " तो आरोपी पुणेकर तरुण म्हणाला, " पण ह्या बाबतीत मला थोडंसं बोलायच आहे. फिर्यादीन सांगितलेल्या गोष्टी खऱ्या असल्या, तरी त्या पूर्ण सत्य मात्र नाहीत. तिनं काही गोष्टी मोठ्या चतुराईन गाळल्या आहेत. तरी महाराज, न्यायदान निःपक्षपातीपणान व्हाव म्हणून फिर्यादीची उलटतपासणी घेण्याची मला परवानगी देण्यात यावी. "

' उलटतपासणी ' हा शब्द ऐकतांच लोकामध्ये पुन्हा थोड्याशा चैतन्यानं संचार केला ! आता खटल्याला थोडा तरी रंग भरणार आणि आजचा दिवस अगदीच फुकट जाणार नाही, ह्या विचारान त्यानी आपले कान टवकारले.

जज्जसाहेबांनी विश्वास पुणेकराला नलिनीची उलटतपासणी घेण्याची परवानगी दिल्यावर विश्वासनं तिला प्रश्न विचारावयास सुरवात केली.

" आपण कुटल्या लॅबोरेटरीजच्या एजंट आहांत ? "

" वात्स्यायन लॅबोरेटरीज . "

" ही कंपनी कोणती औषधं तयार करते ? "

" आमची कंपनी याकुतीची औषधं तयार करते. "

" आपल्या काही औषधाची नांवं सांगा पाहूं ? "

" रमणीविलासार्क,मदनचद्रिका, बलभीममजरी,अनंगरंगगुटिका वगैरे.'

" आपण ज्या दिवशी माझ्याकडे आलात त्यावेळी माझ्या खोलीत आणखी कोण होतं ? "

" कुणीच नव्हतं. "

" माझी वागणूक आपणाला सभ्यपणाची वाटली, हे आपण कबूल केलंच आहे ? ".. •

" होय. "

" आपण एक गोष्ट सांगण्याचं टाळलं आहे. काय तें आठवत का ? "

" कोणती गोष्ट ? "

" आपली चर्चा झाली आणि नंतर तो प्रसंग घडला. ह्या दोहोच्या-मध्ये काय घडलं ? "

" काय घडलं ? मला नाही आठवत ! "

" अशी उडवाउडवीची उत्तरं देऊं नका. तुमच्या कपनीचं एखादं स्मरणशक्ति वाढवणारं औषध नाही वाटत ? "

नंतर विश्वासनं आपल्या खिशात जतन करून ठेवलेला एक हिरव्या रंगाचा छापील कागद बाहेर काढून, आणि तो नलिनीला दाखवून त्यानं प्रश्न केला, " हा कागद आपण ओळखता का ? "

" होय. आमच्या एका औषधाची जाहिरात आहे ती ! "

" त्या औषधाचं नांव काय ? "

" अनंगरंगगुटिका. "

" ही अनंगरंगगुटिका तुमच्या लॅबोरेटरीजमध्ये तयार करतां का ?"

" अर्थात् ! "

" कुठल्याकुठल्या औषधी असतात त्या गुटिकेंत ? "

" अत्यंत दुर्मिळ आणि गुणकारी औषधी आहेत त्या गुटिकेंत. "

" काहीची नावं सागा पाहू ! "

" मदनबाण, गुलाबकळी, वसंतबहार, रंभामूळ, रमणीविलासिनी, ह्या वल्लीच्या मुळाचा, सालीचा किंवा फुलाचा अर्क असतो ह्या गुटिकेंत. "

" आणखी काही औषधं आहेत का ह्या गुटिकेंत ? "

" होय ."

" सागा पाहूं नावं ? "

" सालममिस्त्री, वाघाची चरबी, कोल्ह्याचे दांत, हत्तीच्या गंडस्थळातील मद, मानारच्या आखातांतील मोत्याचं चूर्ण, मगाच्या नाभीतील कस्तुरी आणि मानससरोवरातील कमलांचे पराग, हेहि घटक ह्या गुटिकेंत असतात. "

" हे सारे पदार्थ तुम्ही कोठून पैदा करतां ? "

" ह्याकरता आमच्या लॅबोरेटरीजनी खास माणसं ठेवली आहेत. तीं नेहमी रानावनातून आणि हिमालयांतून फिरत असतात. "

" हया औषधीची नाव आता तुम्ही सागितली किंवा ह्या जाहिरातीत छापली आहेत, त्या औषधी तुमच्या ह्या 'अनंगरंगगुटिकें'त खरोखरच असतात ? "

" अलबत ! "

" अगदी शपथेवर सांगता ? "

" तुमची शपथ ! "

" ह्या गुटिकेच हे अनुपान तुमच्या लॅबोरेटरीजना कसं मिळालं ? "

" आम्हांला ते एका दुर्मिळ संस्कृत ग्रंथांत सापडलं. "

" त्या ग्रंथाचं नांव काय ? "

" संजीवनीचंद्रिका. "

" तिचा लेखक कोण ? "

" धन्वंतरी रुय्यकभट्ट. "

" हा धन्वंतरी रुय्यकभट्ट कोण होता ? "

" पांचव्या शतकांतील सम्राट हर्षवर्धन ह्याचा रुय्यकभट्ट हा राजवैद्य होता. "

" सम्राट हर्षवर्धन ह्या गुटिका घेत असे ? "

" तसा उल्लेख आढळतो. "

" तो ह्या गुटिका का घेत असे ? "

" त्याच्या नाटकशाळेत तीन सहस्त्र स्त्रिया होत्या. म्हणून खास त्याच्याकरताच धन्वतरी रुय्यकभट्टाने ह्या ' अनगरंगगुटिका ' तयार केल्या होत्या. "

" रुय्यकभट्टाला तरी हे अनुपान कस मिळालं ? "

" ते नक्की सागतां येणार नाही. पण श्रीकृष्ण ह्या गुटिका घेत असे आणि त्याच्या मथुरेच्या वैद्यराजाच्या शिष्यपरंपरेतून रुय्यकभट्टाला हे अनुपान प्राप्त झाल, अशी आख्यायिका ' संजीवनीचंद्रिके ' त दिलेली आहे परंतु हा भाग कदाचित् सातव्या शतकाच्या प्रारभी कुणीतरी ' सजीवनीचद्रिके ' त घुसडून दिला असावा, असं काही विद्वानाच मत आहे. त्यामुळे ही आख्यायिका तेवढीशी विश्वसनीय नाही. "

" म्हणजे तुमची गुटिका मूळ संस्कृत ग्रंथाबरहुकूम तयार केलेली आहे. इतंर नकली गुटिकाप्रमाणे ही नकली नाही ? "

" अगदी खरं. सम्राट हर्षवर्धनाला रुय्यकभट्ट ज्या गुटिका देत असे, त्यापेक्षा आमच्या गुटिका काकणभर सरसच आहेत. कारण आमच्या शास्त्रज्ञानी रुय्यकभट्टाच हे अनुपान मिळाल्यानतर, त्यातील औषधीवर जवळजवळ पाव शतक आमच्या प्रयोगशाळातून प्रयोग केले. आणि मग त्या अनुपानात थोडी सुधारणा करून त्यानी ह्या ' अनंगरगगुटिका ' तयार केल्या "

" सम्राट हर्षवर्धन घेत असे त्यापेक्षाहि ह्या तुमच्या गुटिका सरस आहेत ? कुठलंहि विधान करताना आपण न्यायासनासमोर करीत आहोंत हे लक्षात ठेवा. "

" मुळांतल्यापेक्षा आमच्या गुटिका सरस आहेत, हें प्रयोगांनी सिद्ध केल आहे. आणि तरी त्याची किमत माफक आहे. शंभर गोळ्याच्या बाटलीस फक्त दहा रुपये. पाच बाटल्याची एकदम ऑर्डर देणारास टपालखर्च माफ. . . . "

" विचारलेल्या प्रश्नांची तेवढी मुद्याला धरून उत्तरं द्या. नाहीतर न्यायमूर्तींच्या नजरेला मला हा प्रकार आणून द्यावा लागेल. आपल्या अनंगरंगगुटिकेचे गुणधर्म काय आहेत ? "

" ह्या गुटिका म्हणजे साक्षात मदनाचे बाण आहेत. ह्या दोनच गुटिकांच्या सेवनाने नपुंसकाचादेखील महावीर्यवान पुरुष होतो. त्याला कुठलीहि स्त्री रंभेसारखी दिसू लागते. सूर्याला पाहून जसा अंधःकार, किंवा व्याघ्रास पाहून जशी हरिणी, त्याचप्रमाणे ह्या गुटिकाना पाहताच नामर्दाई भिऊन पळून जाते. "

" हा गुण गुटिकांच्या सेवनानंतर किती वेळांत येतो ? "

" साधारण पांच मिनिटांत. "

" अगदी नक्की ? "

" कदाचित् आधीच. "

" आपण जे हे औषधीचं गुणवर्णन केलं आहे, त्या थापा नाहीत ना ? "

" त्यात यत्किंचित्देखील अतिशयोक्ति नाही. असल्यास अल्पोक्तीच असेल. ही एकएक गुटिका म्हणजे एकएक मदनबॉंबच आहे ! "

" इथं कोर्ट आहे. उपमाउत्प्रेक्षाची इथ जरूर नाही ! बरं,मी बलात्कार केला, तेव्हा आपण मला विरोध केला का ? "

" केला. "

" मग ? "

" पण तुमच्या अगांत हत्तीचं बळ सचारलं होतं. तिथं माझा काय पाड लागणार ? "

" जी गोष्ट सागायची आपण टाळता आहांत, ती आता सांगाल का ? "

" मी जेवढं सागितलं त्यापेक्षा अधिक मला आठवत नाही ! "

" किती धडधडीत खोटं बोलते ही बाई ! ' असं सुचवणाऱ्या दृष्टीनं विश्वासनं एकदा न्यायमूर्तींकडे पाहिलं आणि मग नलिनीकडे अगदी रोखून पाहात त्यानं प्रश्न केला, " नीट आठवण करा. हा प्रकार होण्यापूर्वी काय घडलं ? "

" कांही नाही. मी आपली औषधांची माहिती देत होतें तुम्हांला. "

" हं-आणखी थोडी आठवण करा-हं. आता आठवेल तुम्हांला ! "

" मी एका औषधाचा नमुना दिला तुम्हांला. "

" अस्सं. आता कसं आठवलं ? कुठल्या औषधाचा नमुना दिलांत तुम्ही मला ? "

" अनंगरंगगुटिकेचा. "

" आणि त्या नमुन्याचं मी काय केलं ? "

" तुम्ही एक फुलपात्रभर पाण्याबरोबर त्या गुटिका गुट्टकन गिळून टाकल्या. "

" आणि मग ? "

" आणि मग तुम्ही माझ्यावर झडप घातली ! "

" तुम्ही बसू शकता ! "

साऱ्या कोर्टवरून एकदा विजयी मुद्रेनं नजर फिरवून विश्वास म्हणाला, "जज्जसाहेब, माझं बचावाचं भाषण फारसं मोठं नाही. उलटतपासणीत ज मुद्दे स्पष्ट झाले आहेत,त्याचा जर आपण पूर्वग्रहविरहित निःपक्षपातीपणानं विचार केला,तर आपणांला अस दिसून येईल की,मी पूर्णपणे निर्दोषी आहे,फिर्यादीने केवळ दुष्ट हेतूने ही फिर्याद माझ्यावर गुदरली आहे. उलटतपासणीत स्पष्ट झालेले महत्त्वाचे मुद्दे असे : मुद्दा नंबर एक–अनंगरंगगुटिका हें औषध शास्त्रशुद्ध रीतीन तयार केलेल आहे. तिचं मूळ अनुपान पाचव्या शतकातल्या सम्राट हर्षवर्धनाचा राजवैद्य जो रुय्यकभट्ट त्याच्या 'सजीवनी-चद्रिका' ह्या दुर्मिळ संस्कृत ग्रंथावरून घेतलेलं आहे. मुद्दा नंबर दोन–हें औषध अत्यत प्रभावी आहे व ते सेवन केल्यापासून पाचच मिनिटात पुरुषाची कामशक्ति उद्दीपित होते आता सर्वांत महत्त्वाचा मुद्दा जो नंबर तीन तो पुढे मांडतों–ह्या अशा ज्वलज्जहाल औषधीच्या दोन गुटिका फिर्यादीनं मला दिल्या. त्या मी नमुन्यादाखल सेवन केल्या, तेव्हा फिर्यादीनं मला विरोध केला नाही ! फिर्यादी स्त्री सुशिक्षित आणि चतुर आहे. त्या गोळ्या मी घेतल्या की त्यांचा माझ्यासारख्या तरुणावर काय परिणाम होईल, ह्याची जाणीव फिर्यादीनें ठेवावयास पाहिजे होती.त्यांतून आम्ही एकांतांत होतो, आणि माझ्यासमोर ही अशी सौंदर्याची खाण बसलेली होती. महाराज, आता आपणच विचार करा. अशा परिस्थितीत माझ्या मनाच्या कितीहि विरुद्ध असलं तरी जो प्रकार घडला तोच घडल्याविना कसा राहतां ? त्यावेळी गुटिकांच्या सेवनामुळे मी मदनाच्या हातांतील केवळ एक बाहुलं बनलो होतों ! तरी माझा बचाव असा आहे की, फिर्यादीवर मी बलात्कार केला हें मला एकदम कबूल आहे. परंतु परिस्थितीच अशी होती की,तो बलात्कार करूनहि मी पूर्णपणे निर्दोषी आहें ! "

जज्जसाहेबानी आरोपीच भाषण लक्ष देऊन ऐकलं. नंतर त्यांनी थोडा वेळ कागदपत्र चाळले आणि मग गभीरपणान त्यांनी निर्णय दिला, " आपण एखाद्या माणसाला अफू खावयास दिली आणि मग त्याला गाढ झोप लागली तर त्याबद्दल आपण त्या माणसाला दोषी धरूं शकू काय ? एखाद्या माणसाला आपण विष दिल आणि तो मेला तर त्या माणसावर आपण आत्महत्या केल्याचा आरोप ठेवू शकू काय ? समजा, कापसाचा एक गठ्ठा आहे. आपण त्याला एक काडी पेटवून लावली. साहजिकच कापसाचा गठ्ठा पेट घेईल. पण पेटती काडी लावल्यावर त्या कापसाच्या गठ्ठचान पेट घेतला म्हणून आपण त्या कापसाच्या गठ्ठचाला गुन्हेगार ठरवू शकू काय ? अर्थात् नाहीच. कारण पेटत्या काडीच्या सान्निध्यात आल्यावर पेट घेण हा कापसाच्या गठ्ठचाचा स्वभावधर्मच आहे. ते नैसर्गिकच आहे ! तद्वतच ह्या खटल्यातला आरोपी जो विश्वास पुणेकर ह्याला आपण दोषी ठरवू शकत नाही. ' वात्स्यायन लॅबोरेटरीज ' चं अतिशय जालीम कामोद्दीपक औषध जे ' अनगग्गगुटिका ' ते फिर्यादी नलिनी देशपाडे हिने आरोपीस खावयास दिल. तें औषध आरोपीनें खाल्ल्यावर त्याचा काय परिणाम होईल, हे त्या औषधीचे गुणधर्म चांगल्या प्रकारे माहीत असलेल्या फिर्यादी स्त्रीला समजावयास पाहिजे होतं. ते औषध घेतल्यावर विश्वास पुणेकरासारखा तगडा तरुण फिर्यादी स्त्रीसारख्या सुदर तरुणीच्या सान्निध्यांत स्वस्थ बसून राहील, हे मुळीच शक्य नव्हतं. सबब, ह्या गुन्ह्याच्या विशिष्ट परिस्थितीचा आणि पुढे आलेल्या पुराव्याचा सर्व बाजूनी विचार करून मी असा निकाल देतो की, आरोपी विश्वास पुणेकर याला मी, नलिनी देशपाडे हिच्यावर बलात्कार केल्याच्या आरोपातून पूर्णपणें दोषमुक्त म्हणून सोडून देत आहे ! "

विश्वास पुणेकर कोर्टांतून घरी आला. खटल्यांतून पूर्णपणें दोषमुक्त होऊन सुटून आल्याबद्दल त्याला आनंद होण साहजिक होतं. त्या आनंदाच्या भरांत तो शीळ घालीत खोलीतल्या खोलीत येरझाऱ्या घालू लागला. किती तरी महिन्यांपासून खोलीतल्या भिंतीच्या फळयावर दाटीदाटीनं उभ्या असलेल्या ' अनंगरंगगुटिका ' च्या असंख्य बाटल्या त्याला नलिनी देशपांडे-सारख्या सुंदर दिसत होत्या. खिडकीतून दिसणाऱ्या खोलीबाहेर पडलेल्या

कसल्या तरी रानपाल्याच्या आणि विटकुरांच्या भुग्याच्या राशी त्याला सोन्याच्या टेकडीसारख्या दिसत होत्या.

येरझाऱ्या घालतांघालता तो अस्वस्थ होऊ लागला. तो कुणाची तरी वाट पहात होता. पण ती व्यक्ति अजून आलेली नव्हती . त्याची शीळ हळूहळू बंद पडली. येरझाऱ्या थाबवून तो खिडकीशी उभा राहिला. आणि जेव्हा ती अपेक्षित व्यक्ति त्याला दुरून येताना दिसली, तेव्हा तर तो थोडासा रागावलेलाच होता.

" किती उशीर हा ? " त्यानं रागान विचारलं.

" मी तरी काय करूं ? लोक मला सोडीचनात ! ऑर्डरी देण्याकरतां लोकांची नुसती रीघ लागली होती ! "

" होय ? " त्यान आनंदान विचारलं.

" होय. आणि ते बुढ्ढे जज्जसाहेब—त्यानी मला चेबरमध्ये बोलावून घेतलं, आणि पहिली ऑर्डर नोदवली. गावांतल्या झाडून साऱ्या पेन्शनरानी ऑर्डरी दिल्यात गुटिकेच्या. आता आपल्या ' वात्स्यायन लॅबोरेटरीज ' ला भरभराटीचे दिवस येणार ! "

" बरं. आता ते काढून टेवलेलं मंगळसूत्र घाल पाहू गळयात. त्यावाचुन गळा कसा ओकाओका दिसतो ! "

" खरंच बाई ! मलाहि सारखं चुकल्याचुकल्यासारखं वाटत होतं कोर्टात. " मंगळसूत्र घालता घालता ती म्हणाली.



# द्विभार्यायोग !

पंडित रोहिणीचंद्र त्या दिवशी माझ्याकड आला, तेव्हा त्याची मुद्रा खिन्न दिसत होती. ह्याचा अर्थ असा नव्हे की, त्याचा चेहरा नेहमी आनंदी असे. पण त्याच्या चेहऱ्यावर आनंद नसला तरी खिन्नपणाहि क्वचितच असे. त्याच्या चेहऱ्यावरचा स्थायीभाव म्हणजे गंभीरपणा !

आणि तसा गंभीरपणा त्याच्यासारख्या ज्योतिष्याच्या तोंडावर असावा, हे साहजिकच होतं. जगावर कोणती संकटं कोसळणार आहेत, कोठकोठल्या भागांत दुष्कळ पडणार आहेत, कुठे भूकंप किवा रक्तपात होणार आहेत नि आपल्या मित्रापैकी कोणाला कधी अपमृत्यु आहेत, ह्या सर्व गोष्टी अगाऊ माहित असलेला माणूस आनंदी दिसणंच असंभाव्य !

त्यानं जरी अलीकडं ' पडित रोहिणीचंद्र ' हे नांव धारण केलेलं असलं तरी त्याचं खरं नांव तुमच्यामाझ्याप्रमाणच " रामचंद्र गोपाळ जोशी " असं अगदी साधं, सरळ नि नीरस होतं. लहानपणापासूनची आमची मैत्री मी डॉक्टर झालों नि तो बी. ए. होऊन कारकून झाला. नतर त्याला ज्योतिषाचा आणि कुडल्या पाहण्याचा नाद लागला. पुढ त्याला असं दिसून आलं की, कारकुनी-पेक्षा हाच धदा अधिक किफायतशीर आहे. एक दिवस त्यान आपली नौकरी सोडून दिली नि आपल्या घरावर ' सुप्रसिद्ध ज्योतिषी पंडित रोहिणीचंद्र ' अशी एक भली मोठी पाटी लावून दिली.

अर्थातच, त्यान ' रोहिणीचद्र ' हे नांव कां धारण करावं ह्याला, तें नांव ज्योतिषशास्त्राला चांगलंच परिचित आहे, ह्याखरीज आणखीहि एक गुलाबी कारण होतं.

" काय पंडित रोहिणीचंद्र ? " तो स्वतःला मोठा ज्योतिषशास्त्रकोविद समजत असला, तरी तो मला राम्या जोशीच होता व मी त्याला नेहमी थट्टेनं ' रोहिणीचंद्र ' अशीच हाक मारी. " आज खुषीत नाही दिसत स्वारी ? एखाद्या ग्रहाची तुझ्यावर वक्रदृष्टि झाली की काय ? "

त्यावर त्यानं माझ्याकडं एकदा नापसंतीच्या दृष्टीनं पाहिलं आणि मग माझ्या थट्टेकडे दुर्लक्ष करून तो म्हणाला, " होय, मी मोठ्याच पेचात सापडलों आहे. "

तो हे बोलला त्यावेळचा त्याचा चितातुर चेहरा पाहून मीहि गंभीर झालो नि त्याला विचारलं, " काय झालंय्, सांग तरी. "

" मोठीच चमत्कारिक आहे माझी अडचण ! " तो हनुवटी चोळीत सागू लागला, " रोहिणीशी माझं लग्न होणं इतक्यांत शक्य नाही, अस मला वाटू लागलंय् ! "

त्याच्या ह्या उत्तरानं मला चांगलाच आश्चर्याचा धक्का बसला. रोहिणीवर त्याचं असीम प्रेम असल्याचं नि त्यांचं लग्न जवळजवळ नक्की ठरल्याच तो मला वरचेवर सागे. मग हा काय प्रकार होता ? त्यांच्या लग्नात अशी काय अडचण उभी राहिली होती ?

" कां ? ती लग्नाला तयार नाही का ? तिच्या घरची मंडळी विरुद्ध आहेत ? " मी विचारल.

" ऊ हू ! "

" मग अशी कोणती अडचण आहे ? आणि अशा एखाद्या अडचणीला भिऊन तिच्याशी लग्न न करण्याइतक तुझ प्रेम लेचपेचं थोडंच आहे. ? "

" होय. अशी एखादी मानवनिर्मित अडचण असती, तर मी तिला दाद दिली नसती. " तो गंभीरपणानं म्हणाला, " माझी अडचण दैवी आहे ! "

" म्हणजे ? "

" पर्वा सहज मी माझी कुंडली पाहिली. ती पाहण्याचा मूर्खपणा मी केला नसता, तर फार बरं झाल असतं, अस आता मला वाटू लागलय्. तुम्ही डॉक्टर लोक जसे स्वत:साठी स्वत.ची औषधं घेत नाही, तसंच आम्ही ज्योतिष्यानीहि स्वत:ची कुडली पाहूं नये. पण त्या दिवशी माझं कुतूहल अनावर झालं. म्हटलं, ' पाहू या तर खरं काय आहे कुंडलीत. आपली सहज गंमत. नुसती कुडली पाहिल्यानं थोडंच कांही नुकसान होणार आहे ? ' पण ती मी मनाची निव्वळ फसवणूक करीत होतों. सहज म्हणून मी कुंडली पाहिली मात्र, नि मग माझं मन:स्वास्थ्य कायमचं बिघडलं ! "

" असं काय आहे तुझ्या कुंडलीत ? "

" त्यांत गुरु-मंगळाचा अशुभ दृष्टिसंबंध झाला आहे. ह्याचा अर्थ मला द्विभार्यायोग आहे ! "

" एकदम दोन बायका ? "

" नाही आधी प्रथम पत्नीचा मृत्यु. नतर दुसरी बायको ! "

तरी त्याची अडचण नीटशी माझ्या लक्षात आलेली नाही, अस पाहून तो स्पष्टीकरण करू लागला, " ह्याचा अर्थ असा की, मी जर रोहिणीशी आता लग्न केल तर तिला लवकरच मृत्यु येईल, नि त्याला मी कधीहि तयार होणार नाही. जिच्यावर मी प्राणातिक प्रेम करतो, तिला मी आपल्या हातानी मृत्यूच्या जबड्यात कसा ढकलू ? "

त्याची अडचण आता माझ्याहि लक्षात पुरती आली होती. त्यातून मार्ग कसा काढावा, ह्यावर मी विचार करूं लागलो त्यान रोहिणीशी लग्न केल्यान तिला अपमृत्यु येणार होता व त्यांच लग्न न झाल्यास ती दोघहि जन्माची दु खी होणार होती.

" चल ! तुझ हे ज्योतिषशास्त्र म्हणजे निव्वळ थोताड आहे. " त्याला धीर यावा म्हणून मी म्हणालो, " असा कुठे आकाशातील ग्रहाचा माणसाच्या आयुष्यावर परिणाम होतो का ? सृष्टीच्या नियमानी बाधले गेलेले ग्रह आकाशात भ्रमण करीत असतात, नि तुम्ही ज्योतिषी त्याचा सबध माणसाशी जोडतां ! "

" मला तुझ्याशी ह्या बाबतीत वादविवाद घालायचा नाही. " तो निर्णायक स्वरात म्हणाला, " ज्योतिषशास्त्र खर की खोटं, हा प्रश्न सोडून दे. एवढं मात्र मी खात्रीन सागतो की, आतापर्यंत ज्योतिषशास्त्राच्या आधारें मी जी जी भविष्यं वर्तविली, ती अगदी बिनचूक नि सांगितलेल्या वेळेप्रमाणे बरोबर ठरली. कुडलीप्रमाणे मी भविष्य करीत असे. कित्येकदा तर तें इतकं अशक्य कोटीतल वाटे की आपलं भविष्य चुकणार आणि आपली फजिती होणार असं माझ मलाच वाटे. असं वाटलं की, मी पुन्हा ती कुडली तपासून पाही आणि मग त्यातले ग्रह जणू माझ्या कानात तेंच भविष्य अगदी ओरडून सांगत. आमचं शास्त्र खरं आहे म्हण किवा मला कांहीतरी दैवी देणगी आहे म्हण, पण आतापर्यंत मी केलेली सारी भविष्यं खरी ठरली आहेत, हे मात्र खरं. "

मी गप्प बसलेलों पाहून तो परत बोलू लागला, " बढाई मारण्याचा माझा स्वभाव नाही, पण माझी भविष्यं किती अनपेक्षित रीत्या खरी ठरतात,

ह्याची तुला एकदोनच उदाहरणं देतों. आपला तो दत्तू खरे ! व्हिक्टरी मिल-मध्ये चाळीस रुपयांवर कारकून होता. त्याची कुंडली मी सहज पाहिली आणि त्याला सागितलं, ' अमुक अमुक दिवशी आकस्मिक लाभाची आनददायक वार्ता तुला कळेल. ' त्याच्या कुंडलीत गुरुहर्शलाचा शुभ दृष्टियोग होता. आता दत्तू खरे कशा तऱ्हेचा माणूस आहे, ठाऊकच आहे तुला स्वत:च नाक कापून दुसऱ्याला अपशकून करील. केवळ माझ भविष्य खोटं पाडावं म्हणून त्यानं मी सांगूनहि लॉटरीच तिकीट घेतल नाही.आडव्या उभ्या शब्दांची बक्षिसांची कोडी तो नेहमी सोडवीत असे, पण तेहि त्यानं बद केलं. माझी नाचक्की होणार, अम मलाहि वाटू लागलं. पण अखेरीस माझ भविष्य अगदी अकल्पितपणें मी सागितल्या तारखेला खर टरलं ! "

तो चिंतेत असूनसुद्धा ह्या वेळी त्याचा चेहरा अभिमानान थोडासा खुलला.

" ते कस ? " मी उत्सुकतेन विचारलं.

" त्याच दिवशी एका सॉलिसिटरकडून त्याला एक पत्र आलं त्याचा कोणी चुलत–चुलत–मामेकाका आफ्रिकेत वारला होता. त्याची खूप इस्टेट होती, नि त्याचा सर्वांत जवळचा नातेवाईक वारस दत्तू होता ! एकदम तो लाखोपति झाला. "

मी विस्मयचकित झालो.

" अशी आणखी कितीतरी उदाहरण मी देऊ शकेन. " तो पुढं म्हणाला, " राम उपासनी मोठा पट्टीचा पोहणारा पण त्याची कुंडली त्याला पाण्यापासून भय असल्याचं स्पष्ट दाखवीत होती. मी त्याला सूचना दिली. तोहि समजस असल्यामुळे त्यान काळजी घ्यावयास सुरवात केली, आणि पोहण सोडून दिल तरी पण माझ्या मनाला स्वस्थता नव्हती अमुक एका दिवशी त्याला जलमृत्यु येणार होता. ते मी अर्थातच त्याला सागितलं नव्हत, पण त्याच्या वडील भावाला मी तस सागून ठेवल होत. त्या दिवशी राम मित्रमडळीबरोबर चौपाटीवर फिरावयास गेला नि भेळ खात बसला. इतक्यात समुद्रात कोणीतरी पोहावयास गेलेला इसम गटांगळ्या खात असलेला त्यांना दिसला. तो फार दूर नव्हता. रामला वाटल, आपण त्याला सहज वाचवू. त्यानं समुद्रांत उडी घेतली नि त्या इसमाला घेऊन तो बाहेर आला. त्याच्या मित्रांनी त्या माणसाला रामच्या

हातांतून गुडघाभर पाण्यांतूनच उचलून घेतलं, नि किनाऱ्यावर आणून ते त्याला शुद्धीवर आणण्याचे प्रयत्न करूं लागले. राम मात्र त्या थोड्याशा पोहण्यानहि थकून गेला होता—त्याला पोहण्याचा अलीकडे सराव नव्हता म्हणून असेल ! त्याच्या पोटऱ्यांत एकदम वांब आले नि तिथंच तो कोलमडून पडला. त्याचे मित्र त्या बेशुद्ध माणसाला शुद्धीवर आणण्याच्या प्रयत्नांत गर्क झाले होते. त्याच्याभोवती बघ्यांची गर्दी झाली होती. रामकडे कुणाचंच लक्ष नव्हतं. एवढा पट्टीचा पोहणारा असूनदेखील तो त्या दिवशी गुडघाभर पाण्यांत बुडून मेला आणि माझं भविष्य खर झालं ! ''

त्याच्या भविष्याविषयी मीहि अशा बऱ्याच गोष्टी ऐकल्या होत्या. त्यावर विश्वास ठेवणं मला भाग होतं. असा एखादा सत्य भविष्य वर्तविणारा ज्योतिषी असूच शकणार नाही असं मला म्हणता येईना. रोहिणीचंद्राच्या अशा गोष्टी ऐकल्या की, मला आमच्या डॉ. पडघमकरांची आठवण येई. एखाद्या रोगावरची त्याची औषधयोजना आम्हांला चमत्कारिक वाटली तरी अखेरीस ती प्रभावी ठरे. ' हेच औषध का दिलं ? ' अस त्यांना विचारलं तर, ' मला वाटल आपलं हे औषध द्यावस ! ' एवढंच ते म्हणत.

आम्हा डॉक्टरात जसे डॉ. पडघमकर, तसाच ज्योतिष्यात रोहिणीचंद्र काहीतरी दैवी देणगी असलेला असावा, असं मी मनात समजत असे.

" आणि माझी भविष्यं अशी खरी ठरतात म्हणूनच मला रोहिणीशी लग्न करायला भीति वाटते. मला द्विभार्यायोग अगदी स्पष्ट आहे. माझं भविष्य अगदी खरं ठरणार, ह्याविषयी मला मुळीच शंका नाही. अशा स्थितीत, तूच साग, मी तिच्याशी कसं लग्न करूं ? तू ह्यातून काहीतरी मार्ग काढशील म्हणून मी तुझ्याकडं आलो आहे. '' एवढं बोलून रोहिणीचंद्र खुर्चीत मागे रेलून बसला. जणू काय असं करून सारी जबाबदारीच यान माझ्यावर ढकलून दिली !

एकंदर परिस्थितीचा थोडा वेळ विचार करून मी म्हटलं, " असं केलं तर?-तुझी पहिली बायको मरणारच! तर तू पहिलं लग्न रोहिणीशी न करतां दुसऱ्या एकाद्या मुलीशी कर. आणि . . . आणि . . . '' पुढं कसं बोलावं हेंच मला समजेना. त्याच्या भावी पत्नीच्या मृत्यूची कल्पना त्याला स्पष्टपणें सांगणं मला बरं वाटेना.

" हं. आलं लक्षांत." पं. रोहिणीचंद्र एकदम म्हणाला, " माझ्याहि मनांत हीच कल्पना आली होती."

एवढं बोलून त्यानं एक समाधानाचा सुस्कारा टाकला. कदाचित्, ह्या विचारानं त्याच्या सदसद्विवेकबुद्धीला जी टोचणी लागली होती ती, मी त्याच्याशीं सहमत झाल्यामुळे कमी झाली असावी.

" नंतर मग दुसरं लग्न रोहिणीशी कर " – मी.

" हो. तें ओघानंच आलं मग ! "

पं. रोहिणीचंद्र येताना खिन्न चेहऱ्यानं आला होता, पण जातांना खुषीत गेला.

.

थोडयाच दिवसांत, रोहिणीची समजूत घालून त्यानं एका मुलीबरोबर लग्न करून टाकलं. वत्सलेची–त्याच्या नूतन परिणित पत्नीची-फसवणूक होत असलेली पाहून मला तिची कीव येई, नि रोहिणीचंद्राचं भविष्य निदान ह्या बाबतीत तरी खोटं पडाव अशी मी मनातल्या मनात आशा करी.

एक दिवस तो वत्सलेला माझ्याकडे घेऊन आला आणि म्हणाला, " डॉक्टर, आमची ' ही ' अतिशय अशक्त आहे. तिला चांगला औषधोपचार सुरू करा."

मी वत्सलेकडे पाहिलं. ती म्हणजे निव्वळ हाडाचा सापळा होती. जरा जोराचा वारा आला तर ती उडून जाईल अशी भीति वाटे. अशी मुलगी लवकरच परलोकवासी होईल, हे भविष्य वर्तवायला कांही पं. रोहिणीचंद्रासारखा ज्योतिषी नको होता !

तिला तपासून झाल्यावर, मी रोहिणीचंद्राला म्हटलं, " बऱ्याच अशक्त आहेत ह्या. त्यांना बरीच इंजेक्शनं द्यावी लागतील. कॉडलिव्हर ऑईलची पिपंच्या पिपं पाजावी लागतील."

" तू काय पाहिजे ते कर. खर्चाची मुळीच काळजी करूं नकोस ! " तो अगदी आनंदांत म्हणाला.

कितीहि औषधं दिली तरी तिचा मृत्यु टळणार नाही ह्याची त्याला खात्री होती. म्हणून तो मला माझी शिकस्त करण्याची परवानगी अगदी सहज देत होता.

त्याचं हे वाक्य ऐकून वत्सलेनं त्याच्याकडे एकदा प्रेमार्द्र दृष्टीनं पाहिलं. तिची ती प्रतारणा पाहून मला अतिशय वाईट वाटलं. रोहिणीचंद्राचा तो आत्मविश्वास पाहून त्याचं हे आपल्या वैद्यकशास्त्राला आव्हानच आहे, असं वाटून मीहि मनातून निश्चय केला, – अगदी शिकस्त करायची, पण वत्सलेला मृत्यु येऊं द्यायचा नाही. मी तिच्या औषधोपचाराला अगदी मनापासून सुरुवात केली आणि नंतर रोहिणीचंद्राच्या ज्योतिषशास्त्राची नि आमच्या वैद्यकशास्त्राची जणू काय कुस्तीच लागली.

माझ्या प्रयत्नाना लवकरच यश येऊं लागल. वत्सलेचं वजन महिन्याला पाचपाच सहासहा पौंडांनी वाढू लागलं. गाल तर इतके वर आले की, त्यांवर सूज आल्याप्रमाणे ते दिसू लागले: हळूहळू तिला आपला पाय उचलणंसुद्धा जड जाऊ लागलं. निरनिराळ्या शक्तिवर्धक इंजेक्शनांचा नि कॉडलिव्हरचा मी तिच्यावर नुसता मारा चालवला होता. ती खोलीत आली की कॉडलिव्हरच्या वासानं खोली भरून जाई.

इतकं झालं तरी रोहिणीचंद्राचा आत्मविश्वास अढळ होता. तो म्हणे, " तू कांहीहि केलंस, प्रत्यक्ष अश्विनीकुमारांनी तिला औषध दिलं तरी माझं भविष्य चुकणार नाही. होणारे न चुकेल, होईल जरी ब्रह्मा तया आडवा ! "

" पाहू या. " मी म्हणे. पण त्याचा तो आत्मविश्वास पाहून माझा आत्मविश्वास मात्र डळमळू लागे. हो ! त्याच काय सागावं ? दोन तासांपूर्वी चांगली हसणारी खेळणारी माणसं अकस्मात् मृत्यु पावलेली मी पाहिली होती. आणि असा विचार मनात आला की, मला वाईट वाटे. बळी देण्यापूर्वी एकाद्या बोकडाला खूप खाऊपिऊ घालून धुष्टपुष्ट करावं, तसा प्रकार तर वत्सलेच्या बाबतींत होत नाही ना ? अशी मला मग शका वाटू लागे.

दिवसामागून दिवस जात होते. हळूहळू अशी दोनतीन वर्षं निघून गेली. पं. रोहिणीचद्र आपल्या धर्मपत्नीच्या मृत्यूची वाट पाहात होता. अलीकडे अलीकडे ह्या बाबतीत तो बराच अधीर होऊ लागला होता. बायकोच्या प्रकृतीकडे पाहून त्याला कांहीच आशेचा किरण दिसेना. फर्ग्युसन कॉलेजच्या हॉस्टेलमधील खुर्चीइतकी तिची प्रकृति आता ठणठणीत झाली होती. कुठलाहि रोग तिच्या वाटेससुद्धा जाईना. कुंडली पाहण्यांत आपली काही चूक तर झाली नाही ना ? अशी शंका येऊन रोहिणीचंद्र वरचेवर आपली कुंडली तपासून

पाही. छे ! त्यात तर कांहीच चूक झाली नव्हती. त्याचा द्विभार्यायोग अगदी सूर्यप्रकाशाइतका स्पष्ट होता. तो आपल्या बायकोवर नि माझ्यावर चिडू लागला.

एक दिवस तो माझ्याकडे येऊन म्हणाला, " आता एक नवीनच सकट येऊं पहातंय् ! "

" काय ? "

" रोहिणी आणखी वाट पहायला तयार नाही. ती म्हणते, ' अशी वाट पहात बसल्ये तर मी म्हातारी होईन किवा वत्सलेच्या आधी मीच खपेन. वत्सलेला तर कधी शिकदेखील येत नाही. ' शिवाय तिचे आईबापहि आता तिच्यामागं लग्नाचा तगादा लावू लागले आहेत. त्याच्या मते हा शुद्ध मूर्खपणा आहे. "

" मी तुला हे आधीच सागत होतो. " त्याला लागेल अशा आवाजांत मी मुद्दाम म्हणालो आणि साऱ्या प्रकारांतला विनोद लक्षात येऊन नंतर मी हसू लागलो.

" हसू नकोस. ही हसण्यासारखी गोष्ट नाही. रोहिणीकरता माझा जीव तिळतिळ तुटतो आहे. " तो म्हणाला.

मला त्याची कीव येत होती. रोहीणीवर त्याचं किती प्रेम होतं हे मला माहित होतं. मी म्हणालो, " तिला आणखी थोडं दिवस वाट पहायला साग. "

" पण तशी आशा करावयास काही जागा आहे का ? " त्यानं अधीर-तेनं विचारलं.

" वत्सलेच्या सध्याच्या प्रकृतीकडे पाहून मला तसलं काहीच चिन्ह दिसत नाही. " मी म्हणालो.

माझं हे उत्तर ऐकून तो फारच निराश झालेला दिसला. त्यानं एक उसासा टाकला.

नंतर त्यानं रोहिणीची नि तिच्या घरच्या मंडळीची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. पण अखेरीस, आम्हां दोघांनाहि मार्गशीर्षातल्या एक गोरज मुहूर्तावर शंकररावांबरोबर झालेल्या रोहिणीच्या शुभलग्नाला उपस्थित राहणं भाग पडलं. वत्सला हवाफेरासाठी कोकणात माहेरी गेलेली असल्यामुळे लग्नाला येऊं शकली नव्हती.

रोहिणीच्या लग्नानंतर रोहिणीचंद्र दिवसेदिवस खंगत चालला. खरं पाहूं गेल्यास, त्याच्या प्रकृतीबद्दल आता काळजीच वाटली असती, पण त्याच्या भविष्यांत अपमृत्यूऐवजी द्विभार्यायोग असल्यामुळे मी निर्धास्त राहिलो !

रोहिणीच्या लग्नानतर दोनचार दिवसातच त्याच्यांत कितीतरी फरक पडला होता. पण पाचव्या दिवशी तो जो माझ्याकडे आला, तेव्हाच्याइतका त्याचा दुःखी चेहरा मी पूर्वी कधीच पाहिला नव्हता.

आल्याबरोबर माझ्या टेबलावर त्यानं एक पत्र भिरकावलं नि आपल डोकं हातात दाबून धरून तो कोचावर व्याकुळ होऊन पडला.

" काय आहे त्या पत्रांत ? " मी विचारल.

" वाच ! " कसाबसा त्याच्या तोंडांतून उद्गार बाहेर पडला.

मी पाहिलं, तर ते पत्र कोकणातून त्याच्या सासऱ्याकडून आलं होतं. त्यानी लिहिल होतं. :—

' . . . कळविण्यास अत्यंत दुःख होते की, चि. सौ. वत्सलेला काल रोजीं एकाएकी हुडहुडी भरून ताप आला डॉक्टरांना बोलावून आणलें. तिला सन्स्ट्रोक झाला आहे, असे त्याचे मत पडले. उपचाराची शिकस्त केली. पण परमेश्वराची इच्छा बलवत्तर ठरली. तुम्हांला तार करून बोलावण्यासमुद्धा अवकाश मिळाला नाही. काल मध्यरात्री सारा कारभार आटोपला . . . '

मी रोहिणीचंद्राकडे पाहिलं. तो दुःखान चूर झाला होता. त्याच्या डोळ्यात अश्रु जमू लागले होते. वत्सलेवर त्याचं किती प्रेम होतं हें जरी मला ठाऊक असलं, तरी अशा प्रसंगी त्याला दुःख वाटण साहजिकच आहे, असं मला वाटल. मला त्याच्याबद्दल सहानुभूति वाटू लागली. त्याला चार तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगून त्याचं सात्वन कराव म्हणून मी सुरवात केली, " जाऊं दे. झालं ते झालं. त्याबद्दल वृथा शोक करण्यांत काय अर्थ आहे ? होणार असेल ते झाल्याशिवाय राहणार नाही. जन्माला आलेला प्राणी केव्हातरी मरणार, हा जगाचा नियम आहे. वत्सलेच्या मृत्यूनं तुझ्यावर दुःखाचा डोंगर कोसळला असला तरी ही सारी माया आहे, ह्या विचारानं तू आपलं मन घट्ट कर. जगरहाटीकडे पाहून . . . "

" उगाच कांहीतरी काय बोलतोस ? " मला मध्येच अडवून तो रागानं

म्हणाला, " ती मेल्याचं मला यत्किचितहि दुःख नाही. ती मरणार हे माझं भविष्यच होतं. पण . . . पण रोहिणीचं लग्न होण्याच्या जरा आधी ती मेली असती तर . . . तर मी आज सुखात असतों ! "

त्याला दुःख झालं होत ते वत्सलेच्या मृत्यूच नव्हे, तर रोहिणीचं लग्न आधीच होऊन गेल ह्याच ! वत्सलेला त्यानं फसवल होत नि त्याचाच जणू तिन मरताना सूड उगवून घेतला होता !

तंत्रशुद्धतेच्या दृष्टीन पाहिलं असता ही गोष्ट इथच संपायला पाहिजे होती. मलाहि वाटल होतं, ह्या प्रकारानतर रोहिणीचद्र स्वस्थ बसेल नि हळूहळू रोहिणीला विसरून जाऊन दुसऱ्या एकाद्या मुलीशी नाही तर विधवेशी लग्न लावून आपलं भविष्य खरं करील. पण एवढ्यावरच पराभव कबूल करायला रोहिणीचंद्र तयार नव्हता.

एक दिवस मी त्याला म्हटल, " आता पुढं काय ? करून टाक आता दुसरं लग्न ! "

" छे छे ! " त्यावर त्यानं उत्तर दिलं, " माझ्या नशिबांत आता आणखी एकच लग्न आहे नि ते मला रोहिणीशीच करायचं आहे. "

त्याचं हे उत्तर ऐकतांच मला वाटलेल्या आश्चर्याचा भर ओसरल्यावर मी विचारलं,

" पण ते कसं शक्य आहे ? तुला वेडबिड तर नाही ना लागलं ? "

" हें अगदी शक्य आहे. रोहिणीला जर वैधव्य आलं तर शक्य आहे. "

" मग आहे का तिला तसा योग ? "

" आहे. "

" आणि पुर्नविवाहाचाहि योग आहे का ? "

" अ ? त्याविषयी काहीच बोध होऊं शकत नाही. " तो जरा निराशेच्या स्वरांत म्हणाला.

" तेंहि साहजिकच आहे. ज्यावेळी ज्योतिषशास्त्र रचलं गेलं, त्यावेळी पुर्नविवाहाची चाल होती कुठं ? अर्थात्च ते कुठल्या योगाचं फल आहे, हेहि त्यांत दिलेलं नसणार ! " मी थोडसं थट्टेनंच म्हणालो.

माझं म्हणणं त्याला एकदम पटलंसं दिसलं व ह्याविषयीच्या त्याच्या मनांतील शंकाकुशंका नाहीशा झाल्या. रोहिणीला वैधव्य प्राप्त होईपर्यंत

आपणहि विधुरावस्थेतच राहणार,अशा भीष्मप्रतिज्ञेचा त्यानं उच्चार तिथल्या-तिथच केला.

पूर्वी आपल्या बायकोच्या मृत्यूची वाट पहात बसण हा त्याचा उंद्योग होता. आता तो शकररावाच्या मृत्यूची वाट पाहू लागला.

एक दिवस मी त्याला विचारल, " पण तू शकररावांची कुंडली पाहिली आहेस का ? "

" हो त्याच्या वाढदिवसाच्या तारखेवरुन मी त्यांची कुडली मांडली आहे. "

" मग तुला आशेला काही जागा आहे ? "

" आहे तर ! त्याना शस्त्रापासून . . . " एवढ बोलून तो एकदम थाबला. तो जे काय सागणार होता, ते सांगाव की सागू नये, ह्याचा जणू त्यान विचार केला आणि शेवटी ते न सागणच बर, अस ठरवून तो पुढं बोलू लागला, " ह्या एक वर्षातच त्याच्यावर एक मोठ प्राणातिक गडातर येणार आहे "

" ह्या वर्षातच ! नक्की तारीख काढली आहेस तू ? "

" नक्की तारीख मला काढता आली नाही. कारण त्याची नक्की जन्म-वेळ मला मिळाली नाही. पण त्याच मोठस महत्त्व नाही ह्या वर्षातच त्याच्यावर गडातर येणार आहे नि एक वर्षभर वाट पहायला माझी खुषीन तयारी आहे ! "

रोहिणीवरील त्याच्या प्रेमामुळे तो असा बोलत असला, तरी त्याची वागणूक मला दुष्टपणाची वाटल्यावाचून राहिली नाही. त्याच्यावर रागवावं की त्याची कीव करावी, हेच मला समजेना.

थोड्याच दिवसात लढाई सुरू झाली आणि एक दिवस शंकरराव माझ्या दवाखान्यात आले.

" काय शकरराव ? आज इकडे कुठे ? " मी विचारलं.

" जरा प्रकृति तपासून घ्यायला आलों आहें. " ते हसत हसत म्हणाले.

" का ? काय होतंय तुम्हाला ? "

" होत नाही कांही, पण मला किंग्ज कमिशनसाठी अर्ज करायचा आहे. तेव्हा म्हटलं, आधी तुमच्याकडून तपासून घेऊन पाहूं या. "

त्यांचे हे शब्द ऐकून मी मनांतून जरासा चरकलोंच. ह्या गृहस्थाच्या

नशिबात ह्या वर्षीच गडातर आहे असं रोहिणीचंद्र म्हणाला होता नि हा गृहस्थ तर उघड्या डोळ्यानी मृत्यूच्या जबड्यात जाऊ पहात होता ! ज्योतिषावर अजून माझा पूर्ण विश्वास नसला तरी रोहिणीचंद्राची भविष्यं बहुधा खरी ठरतात, येवढ मी मनातल्या मनात आता कबूल करूं लागलों होतों. मग शकररावाना ह्या विचारापासून परावृत्त करणं हे माझं कर्तव्य नव्हतं काय ? भविष्याच कारण सागून सैन्यात शिरण्याच्या विचारापासून त्याच मन वळविण्याचा मी प्रयत्न केला असता तर त्यानी मला मूर्खांतच काढल असतं. मग काय कराव ? सैन्यात भरती व्हायला तुम्ही नालायक आहात असं सागावं का ? असं करण्यात आपण रोहिणीचद्राला फसवल अस तर नाही ना होणार ? हे विचार शकररावाना तपासताना माझ्या मनांत येऊन गेले. पण माझा प्रश्न आपोआपच सुटला, कारण शकररावाना सैन्यात शिरण्याला अयोग्य ठरविण्यास पुरेस कारण मला लवकरच सापडल.

" तुमच्या पोटात कधी जोराच्या कळा येतात का ? " त्याच पोट तपासताना मी विचारल.

" हो, कधी कधी वर्षा–सहा महिन्यानी पोटात खूप दुखू लागतं खरं ! "

नतर मी त्याना अपेंडिसायटीसची सर्व लक्षण विचारली नि त्याना सागितल, " तुम्हाला क्रॉनिक अपेंडिसायटीस आहे. तुम्ही सैन्यात जाऊ नये हे चागल ! "

त्यानतर चारपाच दिवसानी रोहिणीचद्र माझ्याकडे आला, तो जरा घुश्श्यातच. आल्याबरोबर त्यान मला विचारल, " हा शहाणपणा करायला तुला कुणी सागितल होत ? शंकररावाना ' लढाईवर जाऊं नका, ' असा सल्ला तू कां दिलास ? "

" मी माझ कर्तव्य केलं ! "

" कर्तव्य ! " तो चिडून म्हणाला, " नि मित्रकर्तव्य ? "

" म्हणजे ? मला नाही समजला तुझ्या बोलण्याचा अर्थ ! "

" माझ्या बोलण्याचा अर्थ असा की, शंकरराव लढाईवर गेले असते तर ते परत आले नसते. त्यांना लढाईवर जाण्यास अयोग्य ठरवून तू माझं मोठंच नुकसान केलं आहेस ! "

" पण, कांही झालं तरी तुझं भविष्य खरं ठरणारच ना ? मग त्यासाठी शंकररावांनी लढाईवर जाण्याचीच काय जरूर ? "

माझ्या प्रश्नानी तो निरुत्तर झाल्यासारखा दिसला. जरा वेळ आपले हात चोळीत तो स्वस्थ बसून राहिला. नतर तो म्हणाला, " माझं भविष्य खरं होणारच. पण शकरराव लढाईवर गेले असते, तर अधिक सरळ मार्गानं तें खर झाल असतं. एकदाचा काय तो सोक्षमोक्ष होऊन गेला असता इतकच ! "

ह्यानंतर थोड्याच दिवसानी जो एक प्रसग घडून आला आणि त्यावेळी रोहिणीचद्राची जी वर्तणूक माझ्या दृष्टीस पडली, त्यामुळे मी घोटाळ्यातच पडलो. जो मनुष्य शंकररावाच्या मत्यूची मनातून इच्छा करीत होता नि ज्यानं ती इच्छा माझ्याजवळ कैकदा सरळ सरळ व्यक्त केली होती, तोच मनुष्य शकररावाचा प्राण वांचविण्याकरता येवढी धडपड कां करतो, हेच मला समजून येईना !

" तुझ भविष्य खर ठरणारस दिसतय् ! " मी रोहिणीचंद्राला एक दिवस म्हटलं.

" का ? काय झाल ? "

" काल रात्री मला शंकररावांकडून तातडीनं बोलावणं आल होतं. त्याना अपेंडीसायटीसचा फारच वाईट अटॅक आलाय् ! "

" काय म्हणतोस ! " क्षणभर त्याचा चेहरा खुलल्यासारखा दिसला, पण दुसऱ्याच क्षणी त्याच्या चेहऱ्यावर चिता दिसू लागली. " च् च् ! " तो म्हणाला, " मग काय ऑपरेशन वगैरे करावं लागेल की काय ? "

" हो. तोच एक उपाय आहे आता त्याना वाचवण्याचा ! रात्रीच सर्जनला बोलावून आणलं होत. त्याच म्हणणं पडलं, ऑपरेशन केल्यास रोगी जगण्याचा पन्नास टक्के संभव आहे. न केल्यास—काय होईल ते सागतां येत नाही ! पण ऑपरेशन करून घ्यायला शंकरराव तयार होत नाहीत ! "

थोडा वेळ रोहिणीचंद्र विचारांत गढून गेल्यासारखा दिसला. नंतर तो म्हणाला, " छे छे ! त्याना ऑपरेशनला तयार केलंच पाहिजे. मी वळवतो त्यांचं मन. "

त्यानंतर त्यानं शंकररावांना ऑपरेशनकरता तयार केलं; येवढंच नव्हे तर त्याना स्वतः ॲम्ब्युलन्समध्ये घालून तो हॉस्पिटलमध्ये घेऊन गेला ! नंतर तो दिवसांतून दोनतीनदा जाऊन शकररावाच्या प्रकृतीची चौकशी करी.

रोहिणीला तर त्याच्या मदतीचा फारच उपयोग झाला. तिच्याकरता हॉस्पिटलात जेवणाचा डबा घेऊन जा, बाजारहाट कर, वगैरे बरीच काम त्यान आपण होऊन केली.

सुदैवान ऑपरेशननतर शकरराव चागलेच सुधारले. पण मला रोहिणीचंद्राच्या बदललेल्या वागणुकीचं कोडं मात्र उलगडेना. शकररावाना लढाईवर जाण्याविरुद्ध मी सल्ला दिला म्हणून तो माझ्यावर रागावला होता. त्याच्या त्या दुष्टपणाचा मला राग आला होता. पण आताची त्याची ही बदललेली वागणूक पाहून माझा त्याच्यावरचा राग पार नाहीसा झाला.

हॉस्पिटलमधून शकरराव घरी आल्यानतर साधारण महिन्याभरानं रोहिणीचद्र माझ्याकडे आला, नि त्यानं विचारल, "आता शकररावाना परत अपेडीसायटीस होण्याची भीति आहे का ?"

"छे ! आता मुळीच भीति नाही. त्यांच अपेडिक्सच काढून टाकलय् !"

शकररावाच्या प्रकृतीविषयी त्याला वाटणारी काळजी पाहून, नवीनच उत्पन्न झालेल्या त्याच्या त्या चागुलपणाचं मला कौतुक वाटलं. पण तेवढ्यात त्यान, माणसान निराशेनं मोडावा, तसा एक मोठा सुस्कारा सोडला. त्यामुळे मी जरासा घोटाळ्यात पडलो. मला वाटल, मला कदाचित् तसा भास झाला असेल !

"तुझ्या भविष्याप्रमाणे येणारं त्याच्यावरचं गडांतर टळलेल दिसतंय्!" मी म्हणालो.

"हं. तस दिसतय् खर !" तो उदास चेहऱ्यान म्हणाला. त्याचा चेहरा, स्वत च अपरिमित नुकसान करून घेऊन दुसऱ्याच कल्याण करणाऱ्या स्वार्थत्यागी माणसाच्या चेहऱ्याप्रमाणे मला दिसला.

"मग आता तू काय करणार ?" सहानुभूतीच्या स्वरात मी विचारलं.

"दुसरं लग्न करणार. माझ्या ज्योतिषावर एक श्रीमत विधवा खूष झाली आहे. किती तरी दिवसांपासून लग्नाविषयी सुचवते आहे ती मला. तिच्याशी लग्न कराव, असा मी विचार् करतोय् !"

"आणि रोहिणी ?"

"रोहिणी ! तिचा नाद मला आता सोडला पाहिजे. शंकररावावरचं गंडांतर टळल, आता त्याच्या जीवाला वीसपंचवीस वर्ष तरी धोका नाही. तोपर्यंत थाबायच म्हणजे मी नि रोहिणी दोघहि म्हातारे होऊ !"

" मग करून टाक तू ह्या श्रीमंत विधवेशी लग्न ! " मी म्हणालों.

शंकररावाचा प्राण वाचला, नि रोहिणीचंद्रहि रोहिणीचा नाद सोडून देऊन दुसऱ्या लग्नाला तयार झाला, हे पाहून मला आनंद झाला. थोड्याच दिवसात रोहिणीचंद्रानं त्या श्रीमंत विधवेशी नोंदणीपद्धतीनं विवाह केला !

त्यांचं लग्न झाल्यावर थोड्याच दिवसांनी एक दिवस शंकरराव माझ्याकडे आले.

" काय शंकरराव ? बरं आहे ना ? " मी विचारलं.

" तसं बरं आहे पण हजामाकडे दाढी करतांना माझ्या वरच्या ओठाला वस्तरा लागून थोडीशी जखम झाली आहे. ती दाखवायला आलोय् ! " ते सहज म्हणाले. त्याच्या बोलण्यात काळजीचा स्वर मुळीच नव्हता.

मी ती जखम पाहिली. जखमेत थोडासा पू झाला होता आणि आजूबाजूची बरीच जागा लालभडक झाली होती. ओठाच्या असल्या जखमांना आम्ही डॉक्टरलोक किती भितो, ते साधारण लोकांना समजणार नाही. मी शंकररावांना म्हटलं, " आत्ताच्या आत्ता ही जखम सर्जनला दाखवली पाहिजे. ओठाची जखम फारच गंभीर स्वरुपाची असते . . . " ह्यापेक्षा अधिक स्पष्टपणे मला त्यांना सांगता येणं शक्य नव्हतं मी म्हटलं, " ह्यावर ताबडतोब ऑपरेशन केलं पाहिजे ! "

" काय सांगता डॉक्टर ? " हसत हसत शंकरराव म्हणाले, " उगाच काय भिववून सोडतां ? "

त्यांना त्या जखमेचं महत्त्व पटवून देण्याचा मी खूप प्रयत्न केला, पण त्यांनी तिकडे दुर्लक्षच केलं. त्यांनी आपली जखम सर्जनला दाखविली नाही ...

आणि दोनच दिवसात रोहिणीला वैधव्यदशा प्राप्त झाली !

बिचारा रोहिणीचंद्र ! त्याला हे कळताच मोठाच धक्का बसला. पण तो शंकररावाच्या प्रेमाखातर नव्हे, तर त्यानं दुसरं लग्न करण्याच्या आधी हा प्रकार घडला नाही म्हणून !

" दैवानं माझ्याशी काय लपंडाव चालवला आहे पहा ! रोहिणी माझ्या नशिबांत नव्हती, येवढं मात्र खरं ! " निराश होऊन तो बोलत होता.

" लढाईवर शत्रूच्या शस्त्रान शकररावाना मृत्यु आला असता, पण तुझ्या कार-वाईनं ते टळलं. नतर, सर्जनच्या शस्त्रापासूनहि ते बचावले ! . . . "

" म्हणजे ! " मी आश्चर्यानं विचारलं, " त्याना वांचविण्याकरताच तर आपण त्याच ऑपरेशन करवल ना ? "

ह्यावर त्यान जे उत्तर दिल, ते ऐकून शकररावांच्या अपेंडिसायटीसच्या आजारीपणातल्या त्याच्या वागणुकीचा उलगडा तर मला झालाच, पण माण-साचं मन इतकं पाताळयत्री असू शकतं, ह्याच मला आश्चर्य वाटल !

" हं ! " तो किंचित् हसून म्हणाला, " ऑपरेशन केल्यान शकरराव बरे होतील, अस तुला वाटत होत. पण माझ्या शास्त्राप्रमाणे त्याना ऑपरेशननं मृत्यु यायचा होता. त्याच्या कुंडलीत लग्नी मगळ होता, नि पापग्रहाची त्याच्या-वर वक्रदृष्टि होती ह्याच फल—शस्त्रापासून मृत्यु ! " त्या दिवशी बोलतांना तो मध्येच थाबला होता, ते मला आठवल त्यावेळी तो हेच सागणार होता, हे उघड होत. तो बोलू लागला, " शकररावाची जन्मवेळ बरोबर न मिळाल्यामुळे मी त्याच्या मृत्यूची नक्की तारीख काढू शकलो नाही नि त्यामुळेच तर हा सारा घोटाळा झाला— तरी अखेरीस माझ भविष्य खर ठरलच! मी सांगितल्या-पासून एक वर्षाच्या आत त्यांना मृत्यु आला, नि तोहि शस्त्रापासूनच ! —— वस्तरासुद्धा एक शस्त्रच नाही का ? —— "



# अजब प्राणी !

"मला चहा हवाय् ! " मोहन म्हणाला. पुस्तक वाचण्याच सोंग त्यानं कितीतरी वेळ चालवलं होतं. पण त्याचं पोट चहाकरता गिल्ला करत होत. वाचनाकडे कसलं लक्ष लागतय् त्याचं ! त्याला वाटलं होतं, सुलू आपल्या चहाची चौकशी करील पण ती कसली खट ! जणू काय मोहन आपल्या गावीहि नाही अशा ऐटीत लोकरीच्या विणकामात ती गर्क होऊन बसली होती. तिच्या मुग्धपणाला कंटाळून मग अखेरीस सभाषणाला सुरुवात करण मोहनला भागच पडल.

पण सुलून काहीच उत्तर दिल नाही. तिन मान वर करून त्याच्याकडे पाहिलंदेखील नाही.

" मला चहा हवाय्—ए बहिरे ! " जरा चिडक्या स्वरांत मोहन म्हणाला.

" चहा करून ठेवलेला आहे " सुलू म्हणाली, " डोळे धड असलेल्या माणसाला दिसेल ! "

" मी काही आधळा नाही ! दिसला मला तो चहा "

" मग पिऊन टाका "

" तो चहा थड झालाय् ! "

" पुष्कळ वेळ ठेवला की चहा थड होणारच ! "

" मला नकोय तो चहा. " हमरीतुमरीच्या स्वरात मोहन म्हणाला, " थड चहा मला आवडत नाही ! "

" मग एक थर्मास आणून ठेवा ! "

क्षणभर मोहन निरुत्तर झाला मग तो म्हणाला, " मला वाद नको आहे. मला दुसरा चहा करून दे "

" उठल्यासुटल्या चहा करून द्यायला मी कांही पगारी स्वयंपाकीण नाही ! गरम चहा हवा होता तर चहाच्या वेळेला उठायचं होत. रात्रभर ब्रिज खेळत बसायचं क्लबांत आणि मग संध्याकाळपर्यंत झोपा काढायच्या ! "

" खेळलो एखाद दिवस रात्रभर तर–"

" एखाद दिवस ! आज हे पाचव्यादा झालं ! इतक सागते मी–"

" बरं बरं. आधी चहा कर."

" जा ना क्लबात तिथ चहाहि मिळेल आणि पत्तेहि कुटायला मिळतील!"

आजचा सुलूचा रग काही निराळाच होता. लग्न झाल्यापासूनच्या गेल्या दोन वर्षात ती त्याच्याशी इतक्या बेपर्वाईन कधी वागली नव्हती.

" सुलू, फार बोलतेस हं तू !" आपण निरुत्तर झालो आहोत, अस दिसू नये म्हणून मोहन काही तरी बोलायचं म्हणून बोलला. त्याची बाजू पहिल्यापासूनच लगडी होती. चूक त्याचीच होती. मग त्यानं निकराच्या स्वरात विचारल, " मला चहा करून देतेस की नाही साग."

क्षणभर सुलू घुटमळली. मग तीहि निश्चयाच्या स्वरांत म्हणाली, "ज्या माणसाला दुसऱ्याची पर्वा नाही, त्याची दुसरे तरी कशाला पर्वा करतील ?"

" बरं, नाही तर नको करूस!" मोहन म्हणाला, " चहाला काही गावात तोटा नाही पडला हा आत्ता हॉटेलात जाऊन पिऊन येतो."

" खुशाल जा." सुलू बेपर्वाईन म्हणाली, आणि ती पुन्हा आपल्या विणकामांत गर्क झाली.

मोहन हॉटेलांत चहा पिण्याकरता एकदम उठून गेला नाही, भाडणाच्या भरात आपण भलतीच कामगिरी शिरावर घेतली, असं त्याला थोड्याशा विचारानंतर वाटल. हॉटेलातला चहा! नुसत्या त्या चहाच्या आठवणीनं त्याच्या पोटात मळमळू लागल. सुलू चहा करत असे आणि हॉटेलातहि चहा मिळत असे. पण एकाच नावान ओळखल्या जाणाऱ्या त्या अजिबात निराळ्या गुणधर्माच्या वस्तु होत्या एक होत अमृत आणि दुसर होत पावसाळ्यात सांचलेल्या डबक्यांतलं गढूळ पाणी ! हॉटेलात जाण्याकरता काही केल्या त्याचे पाय हालचाल करण्यास तयार होईनात.

त्याला चहाची तल्लफ अनावर झाली होती. तो जरा लाडीगोडीच्या स्वरात म्हणाला, " चहा करना !"

" कां ? हॉटेलांत जाता ना ? मग जा ना ! सकाळच्या गोष्टी लिहीत बसा; दुपारचं हापिसांत जा; रात्रीचं क्लबांत पत्ते कुटत बसा; हॉटेलात चहा प्यायला जा आणि इथं खाणावळीत जेवायला येत जा !" सुलूचा पारा बोलतां

बोलतां चढत होता. " मोठे लेखक झालेत ! चार गोष्टी खरडता आल्या म्हणून काय झालं ? ज्या माणसाला संसार कसा करावा हे कळत नाही, बायकोला सुखात कसं ठेवाव हे समजत नाही, त्याच्या गोष्टी काय चाटायच्या आहेत ? "

" तुझ्यासारख्या अरसिक बायकोला काय कळणार माझ्या गोष्टीची किंमत ! लेखक म्हणून मला वाचकवर्गात केवढा भाव आहे–" मोहननं बोलण्याचा प्रयत्न करून पाहिला, पण सुलूच्या तोंडातून सुटणाऱ्या मशिनगनच्या फैरीत त्याचे शब्द कुठल्याकुठे गडप होऊन गेले.

"... तुम्हांला व्यवहारज्ञान नाही. तुम्हाला साधी भाजी आणता येत नाही. भाजीचा भाव कळत नाही आणि भाजी जून की कुजकी हे कळत नाही ! संसारांत तुमचं लक्ष नाही, मग संसार थाटला तरी कशाला ? ऑफिसात जायचं, गोष्टी लिहायच्या, क्लबात जायचं, पत्ते कुटायचे आणि सिगरेटी फुकायच्या–हाच तुमचा उद्योग घरात बायको एकटी असली तरी, रात्रभर पत्ते खेळत क्लबात बसता ! बायकोची तुम्हाला पर्वाच नाही. तिची काही हौस आहे का, तिला काय पाहिजे, काय नको, कध्धी कध्धी विचारपूसदेखील करत नाही तुम्ही. शेजारचे विनायकराव पहा–लेखक नाहीत नि बिखक नाहीत, पण सुशीलाबाईची हौस पहा कशी पुरवतात ते ! संसार कसा सुरळीत चालला आहे त्याचा ! मोठे लेखक झालेत–"

" सुशीलाबाई स्वयंपाकहि झकास करते ! " मनाचा हिय्या करून मोहन म्हणाला, " तुझ्यासारखा खराब स्वयंपाक करत नाही ती. तिच्या पोळ्या कच्च्याहि राहात नाहीत की करपतहि नाहीत आणि ती विनायकरावांना वेळच्यावेळी जेवायला घालते. तू कधी एक दिवस तरी वेळेवर जेवू घातलं आहेस मला ? "

असं हे बोलण्यात सुलूला निरुत्तर करावं, असा मोहनचा उद्देश होता. पण झाला प्रकार उलटाच. त्यामुळे आगीत तेल मात्र पडलं. सुलू उसळून म्हणाली, " आधी आपलं वर्तन सुधारावं, मग दुसऱ्याला नांव ठेवावीत ! आपण वेळच्या वेळी घरी यावं, संसारात नीट लक्ष घालावं, आणि मग बायकोला नावं ठेवावीत ! एखादं नवीन पातळ आणून द्या म्हटलं तर पैसे नाहीत. मोत्याच्या माळेची मला एवढी हौस, पण ती घ्यायलाहि पैसे नाहीत. आणि ब्रिजमध्ये उडवायला मात्र पैसे आहेत ! ह्या जन्मी तरी माझी हौस भागणार नाही. बरं, दारिद्र्य असलं तरी

माणसाचं बोलणं चालणं तरी नीट असावं. तेहि नाही. मोठे लेखक असल्याची घमेंड असेल तुम्हांला, पण बायकोच्या दृष्टीनं तुम्ही एक छदीफदी कारकुडेच आहांत ! ..... आता ह्या जन्मी तरी माझ्या कपाळी सुख नाही ! देवा, कशाला रे माझ्या नशिबी असला नवरा दिलास ! ”

येवढ बोलून सुलून डोळ्यांना पदर लावला इतका वेळ मोहनन तिचं सारं ऐकून घेतल किती झाल तरी चूक त्याचीच होती. पण सुलूची शेवटची वाक्यं मात्र अगदीच अनपेक्षित होती. ती ऐकून त्याच्या मनावर मोठाच आघात झाला. सुलू आपणांवर कितीहि रागवत असली, टाकून बोलत असली, तरी मनांतून तिच आपणांवर प्रेम आहे ; तिचा तो राग लटका आहे, बोलण कौतुकाच आहे, आणि तिच आपणावर नितात प्रेम आहे, अशी त्याची समजूत होती. पण आत्ताच्या तिच्या बोलण्यान त्याच्या ह्या आवडत्या कल्पनाचा चक्काचूर झाला. सुलूच आपणावर प्रेम नाही ! तिला आपला तिरस्कार वाटतो ! आपल्याशी लग्न केल्याबद्दल तिला दु ख होतय् ! ....

तो एकदम उठला त्यान कोटटोपी अगांत चढवली आणि धोतराचा सोगा हातात धरून जेव्हा तो एखाद्या लालबावटेवाल्यासारखा घराबाहेर पडला, तेव्हा त्याच्या मनात एकच प्रश्न घोळत होता-सन्यास की आत्महत्या ?

डोक्यात वैचारिक अराजक माजल असता एखाद्या भ्रमिष्टासारखा तो थोडसच अतर चालून गेला असेल, तो त्याला गगूनाना भेटले.

येरव्ही अशा प्रसगी तो गगूनानाना आपण होऊन भेटला असता. नवराबायकोत भाडण झालं की ते मिटवण हा गगूनानाचा एक आवडीचा उद्योग होता. आतापर्यत कितीतरी वेळा अशा प्रसगी मोहनन गगूनानाच्या मध्यस्थीचा उपयोग करून घेतला होता. पण आज गगूनानाना शरण जाण्याचा विचारदेखील त्याच्या मनाला शिवला नाही. हो, जो माणूस जिवाला वैतागून सन्यास घ्यावा की आत्महत्या करावी अशासारख्या गभीर प्रश्नाचा विचार करत होता, त्याला गगूनानाच्या मध्यस्थीचा उपयोग तरी काय ?

त्याचा वैतागलेला, भकास चेहरा पाहून गगूनानाचे डोळे आनंदान लुकलुकले. त्यानी त्याला जसं कांही सहज म्हणून विचारल, “काय मोहनराव, ठीक आहे ना ? ”

त्यांना वाटलं होतं, आपण येवढं विचारल की मोहन माजघरांतल्या आघाडीवरच्या ताज्या युद्धाचा इतिहास आपणाला कथन करील आणि मग कसंहि करून युद्धयमान राष्ट्रांमध्ये समझौता घडवून आणाच म्हणून आपणांकडे गयावया करील.

पण छट् ! मोहन त्रोटकपणान उद्गारला, " ठीक आहे सारं ! " आणि तो तसाच पुढ निघून गेला.

मोहन रस्ता चालत होता. आपण नक्की कुठं जात आहोत, हे त्याला कळत नव्हतं-कुठं जायचय् हेच त्यान ठरवल नव्हत मुळी. त्याच्या डोक्यात विचाराची चक्रं फिरत होती आणि जणू त्यापासून उत्पन्न झालेल्या शक्तीच्या जोरावर त्याची पावल सारखी मागपुढ पडत होती.

चालता चालता तो गावाबाहेरील तलावाजवळ आला आणि लगेच त्याला त्याच्या प्रश्नाच उत्तर मिळाल. तो तलाव पाहून सन्यास घेण्यापेक्षा आत्महत्या करणच अधिक सोयीस्कर आहे, असा त्याच्या मनान निकाल दिला.

पण तो विचार त्यान ताबडतोब अमलात आणला नाही येवढी महत्त्वाची गोष्ट अमलात आणण्यापूर्वी पुन्हा एकदा शातपणान नीट विचार करणंजरूर होत. आत्महत्या करायची हे तर नक्कीच, पण त्यापूर्वी तास अर्धातास थोडा सर्व बाजूनी विचार केला, आणि आत्महत्या करण्यात काही चूक नाही अशी खात्री करून घेतली तर काही बिघडत नाही. उलट अगदी शात चित्तान आपणाला तलावात उडी मारता येईल. तलाव थाबू शकेल थोडा वेळ—

विचार करण्यासारख्या गोष्टी पुष्कळच होत्या आपण आत्महत्या केल्यानं ऑफिसातल्या आपल्या कामाचा चारआठ दिवस गोधळ उडेल. आपण ज्याच्या बरोबर ब्रिज खेळतो, त्या मित्रमडळीला चौथा भिडू न मिळाल्यामुळं त्याची अडचण होईल. मग कदाचित् त्याना कट्थ्रोटच खेळत बसाव लागेल—वाङमयक्षिताजावर नुकताच चमकू लागलेला आणि ज्याच्यापासून रसिकाच्या बऱ्याच अपेक्षा आहेत असा एक तारा अकालीच निखळून पडल्यामुळ मराठी वाङमयाच अपरिमित नुकसान होईल; नियतकालिकाच्या सपादकाना आपला अगदीच अनपेक्षित मृत्युलेख लिहिण्याकरता धावपळ करावी लागेल; आणि आपली सुलू—तिला वैधव्य येईल—किती त्रास होईल तिला ! ....

पण ह्या विचारान त्याच त्यालाच हसू आलं. सुलू आपणांला कंटाळली

आहे, आपल्यासारखा नालायक नवरा मिळाला म्हणून ती दुःखी आहे, त्यावरून तर ती आज आपणाला येवढं तोडून बोलली, नि म्हणूनच तर आपण आत्महत्या करण्याकरता इथं आलो आहोत !

पण हा विचार त्याला तर्कशास्त्राच्या दृष्टीनं निरपवाद वाटला तरी तो त्याला आवडला मात्र नाही. सुलूला वैधव्याच्या दुःखात लोटून देण्याची कल्पना त्याला आवडली नाही. त्याच तिच्यावर प्रेम होतं. संसाराला सुरवात होऊन पुरती दोन वर्षंहि लोटली नसतांना तिला सोडून जायला त्याचं मन तयार होईना. त्यापेक्षा आपल्या वागणुकीतल्या ज्या गोष्टी सुलूला आवडत नाहीत त्याच आपण सुधारण्याचा प्रयत्न केला तर ? आपल्या वागणुकीत सुधारणा करण्यास पुष्कळच अवसर आहे —

त्याच्या विचाराना नवी दिशा मिळाली, " जरा थाब, मी तुझी निराशा करत नाही ' असं सांगणाऱ्या दृष्टीन त्यान एकदा त्या तलावाकडे पाहिलं आणि हिरवळीवर रेलून तो आपल्या वैवाहिक जीवनाचा विचार करूं लागला.

त्यांचं लग्न झालं. एक वर्षभर त्यानी ससारात स्वर्गसुख लुटलं. नंतर नवराबायकोत लहानसहान खटके उडू लागले. कधी दोघापैकी एकानं शरणागति पत्करल्यामुळं तर कधी गंगूनानाच्या कुशल मध्यस्थीन ते मिटले खटके उडण्याची काही ठराविक कारणं होती. मोहनच्या अंगी असलेले काही दुर्गुणच त्याला जबाबदार होते. लेखणी, पत्ते आणि सिगारेट ह्या गोष्टीच बहुधा ह्या खटक्यांच्या मुळाशी असत. होता होता हे खटके अधिकाधिक उग्र स्वरूप धारण करूं लागले होते, आणि अखेरीस आज त्याचा अटळ परिणाम म्हणून मोठा स्फोट उडाला होता.

कालची सबंध रात्र मोहन क्लबात ब्रिज खेळत बसला होता. संध्याकाळी खेळावयास बसतांना, अगदी बरोबर दहा वाजतां उठून एखाद्या आज्ञाधारक पतीप्रमाणे घरी जायचा विचार करून तो खेळायला बसला होता. पण दहा वाजले तरी रबर संपलं नाही. त्याला सुलूची आठवण होती. रबर संपतांच क्षणाचाहि विलंब न लावता घरी जायच अस त्यानं ठरवलं. रबर संपलं अकराला. पण त्यावेळी खेळांत इतकी चुरस उत्पन्न झाली होती की सुलूची आठवण मनांत असूनहि मित्रांच्या आग्रहाला तो बळी पडला. घेऊं उरकून दोन रबरं झटक्यांत्

– नाहीतरी उद्या रविवारच आहे – अस म्हणून तो खेळावयास बसला. साडे-बाराच्या सुमारास तीहि रबरं संपली. तो घरी जावयास उठला. पण बाहेर पाऊस पडत होता. त्यानं छत्री आणलेली असली तरी इतर दोघानी निष्काळजीपणानं छत्र्या आणलेल्या नव्हत्या. म्हणून पाऊस थांबेपर्यंत आणखी दोन रबरं खेळण्याचा त्याला आग्रह करण्यात आला. त्याची काहीहि चूक नसताना त्याला घरी जाऊ देण्यात आलं नाही. दोनअडीचला रबर सपली तेव्हा पाऊस थाबला होता, पण अशा अवेळी घरी जाऊन गाढ निद्रासुखाचा उपभोग घेत असलेल्या घरच्या माणसाची झोपमोड करणं प्रशस्त नाही, असं सर्वाचं मत पडल्यामुळ तो आणखी खेळावयास बसला.

ब्रिजची तरी काय गमत असते पहा. त्यात माणसाच मन इतक रमून जातं की वेळ केव्हा निघून जातो, हे त्याला कळतच नाही. जणू काळाचा प्रवाह बद करणारा तो एक बधाराच आहे. त्याचा खेळ सपला आणि त्यानं दचकून खिडकीकडे पाहिल चांगलं फटफटल होतं आणि संसारदक्ष माणसानी आपल्या निद्रेतून उठून कामाला लागाव, अस कोबडे जाहीर करत होते. स्वतःवरच चिडून घाईघाईन तो घरचा रस्ता चालू लागला आता पुन्हा कधी ब्रिजच खेळायच नाही, असा त्यान मनाशी निश्चय केला. बिचारी सुलू ! सारी रात्र तिनं आपली वाट पाहण्यात आणि आपली काळजी करण्यात काढली असेल ! खूपच रागावेल ती – पण तिची समजूत काढू आपण – सारी रात्र ब्रिज खेळत बसलों, हे पाचव्यादा झालं आज – छे छे ! ब्रिज सोडूनच दिल पाहिजे ! —

तो घरी आला तो अगदी पश्चात्तापदग्ध हृदयान. आपल्या चेहऱ्यावरून त्यान सुलूला अगदी स्पष्ट दाखवल की 'माझी चूक झाली. जे झालं त्याबद्दल मला लाज वाटते. क्षमस्व ! ' पण सुलून ते लक्षात घेतलं नाही. तिनं आपल्या तोडाला कुलूप घातल होत. पण तिला जे काय सांगायचं होतं, ते तिची प्रत्येक कृति मोहनला अगदी स्पष्ट शब्दांत सांगत होती. तिचे सुजवट डोळे मोहनला सागत होते, ' तू अपराधी आहेस ! ' मधूनमधून ती नाकान ' सूऽ ' असा आवाज करी. त्या आवाजाचा अर्थ ' तू दुष्ट आहेस ! ' असा मोहनला स्पष्ट समजे. मधूनमधून एखादं भाड आपटल्याचा आवाज त्याच्या कानांवर येई, तेव्हा सुलूनं ' नको ग बाई हा जल्म ! ' हे शब्द उच्चारल्यासारखंच त्याला

वाटे. आणि जेव्हा त्याच्याकडे न बघता मधूनच एखादे वेळी ती आपला पदर डोळ्यांशी नेई, तेव्हा मोहनला वाटे, आपण फाशीचीच शिक्षा ऐकत आहोत !

मोहन वेळ काढत होता. तिची समजूत काढण्याकरता एखादी योग्य संधि मिळण्याची तो वाट पाहात होता. निदान भगवान् सहस्त्ररश्मी अस्ताचलावर गेल्यावर तरी आपण तिचा राग काढूच काढू असा त्याला विश्वास वाटत होता नाना तऱ्हानी तो तिचा अनुनय करण्याचा प्रयत्न करत होता. पण ते सारं निष्फळ ठरल आणि संध्याकाळी चहाच्या प्रकरणावरून स्फोट उडालाच.

रात्रीच्या जाग्रणान मोहनला दुपारी चागलीच झोप लागली. नेहमीच्या वेळी सुलूनं चहा केला आणि आपण पिऊन टाकला. तिन मोहनला चहाकरता उठवल नाही त्याचा चहा एका कपात ओतून तिन झाकून ठेवला आणि लोकर घेऊन ती विणकामात मग्न होऊन गेली साधारण पाचाच्या सुमाराला मोहनला जाग आली. तोड धुवून तो चहा घ्यावयास गेला. पाहतो तो चहा अगदी थडगार ! त्याला सुलूचा अगदी राग आला. आपणाविषयी तिन येवढी बेपर्वाई दाखवावी हे त्याच्या मनाला बरच लागल तो तसाच चहा न घेता बाहेर आला होता, आणि एक पुस्तक घेऊन ते वाचण्याचा प्रयत्न करू लागला होता. त्यानतर मग प्रथम वर्णन केल्याप्रमाण स्फोट उडाला होता.

तलावाच्या काठाशी साऱ्या परिस्थितीवर विचार करत तो कितीतरी वेळ पडून राहिला होता तो विचाराच्या तंद्रीतून जागा झाला, तेव्हा त्याला दिसून आल की, आकाशातली रगपचमी सपली असून तिची जागा दिवाळीन घेतली आहे. एकदम त्याच्या मनात विचार आला, ‘ अरे बराच उशीर झाला की ! सुलू जेवणाकरता वाट पहात असेल — ’

मग एकदम त्याला आपण घरातून का बाहेर पडलो आहोत ह्याची आठवण झाली. त्यानं पुन्हा गभीरपणान विचार करण्याचा प्रयत्न केला—सन्यास की आत्महत्त्या ? पण आता त्याच्या पोटात कावळे कोकलू लागले होते. घरी जाण्याची एक विचित्र ओढ त्याच्या मनाला अस्वस्थ करत होती. एखाद्या सावकाराची दृष्टि चुकवून पळ काढणाऱ्या देणेकऱ्याप्रमाण त्यान तलावाजवळून पावल न वाजवता पळ काढला. आता त्यानं आत्महत्त्येचा विचार मनांतून पार काढून टाकला होता. पण संन्यास घेण्याविषयी मात्र तो जेवण झाल्यावर भरल्यापोटी शातपणानं विचार करणार होता.

तो घरचा रस्ता चालू लागला खरा, पण घर जसजस जवळ येऊं लागलं, तसतशी त्याला भीति वाटू लागली. मुलूला खरोखरीच का आपण आवडत नाही ? तिचं आपणावरचं प्रेम नाहीस का झाल आहे ? नाही तर ती आपणाला येवढ टाकून का बोलली असती ? तिच्या मनात आपणाविषयी तिरस्कार आणि राग ह्याखेरीज दुसरी कुठलीच भावना नाही का ? खरच का आपण अगदी नालायक नवरा आहोत ?. . . घराच्या दिशेनं तो एकएक पाऊल जडपणानं टाकत होता आणि प्रत्येक पावलागणिक त्याच्या मनाला निरुत्साहाच्या दरीत अधिकाधिक खोल लोटणारा एकएक प्रसंग त्याला आठवण होता

मनाचा मोठा धीर करून तो घराच्या दरवाजाशी आला. त्याच्या अपेक्षे-विरुद्ध घरात दिवे लावलेले होते आणि सामसूम नव्हती. त्याला वाटलं होतं, सुलू फुरगटून बिछान्यात पडलेली असेल, घरात अन्धार असेल, कदाचित् चूलहि पेटलेली नसेल. पण आपल्या ह्या भीषण अपेक्षा फोल ठरलेल्या पाहून त्याला जरा बरं वाटल. घरातून सभाषणाचा आवाज बाहेर स्पष्टपणें एकू येत होता एक आवाज होता गगूनानाचा आणि दुसरा होता सुलूचा तिचा आवाज ऐकून त्याच्या मनाला बराच धीर आला. मघाचा राग, दु:ख ह्याचा लवलेशहि त्याला त्या आवाजात दिसून आला नाही त्या आनदात तो घरांत पाऊल टाकणार इतक्यात तो थबकला. सभाषण त्याच्याविषयीच चाललं होतं आणि आपणाविषयी चाललेलं सभाषण चोरून ऐकण्याची सधि मिळाली असता ती कोण दवडील ?

" मोहनराव कुठं आहेत, वहिनी ? " गगूनाना विचारत होते.

" गेले असतील क्लबात ! " – सुलू.

" मला भेटले होते मघा वाटेत. स्वारी रागांतच दिसली. म्हटल, घरात काहीतरी कुरबूर झाली असली पाहिजे. पण गणपतरावाकडे जरा काम होतं. तिथं प्रथम जाऊन आलों. शारदाबाईचं आणि त्याचं जरा बिनसलं होतं ना ? – ह. काय झालं तुमचं नवराबायकोत ? "

"कांही नाही झालं ! "

" काही नाही ! " गंगूनानांच्या स्वरात आश्चर्य आणि निराशा स्पष्ट-पणे प्रतिबिंबित झालेली दिसत होती.मग थोडा वेळ थाबून ते म्हणाले, " मोहन-राव अलीकडे जरा बिघडतच चाललेत ! "

" कां ? "

" त्याना ब्रिजचं व्यसन लागलंय् अस ऐकतो. अहो, ब्रिजच व्यसन फार वाईट. त्यामुळ नवराबायकोत भाडण होतात. घटस्फोटापर्यंत पाळी येते ! काल रात्रभर मोहनराव क्लबात ब्रिज खेळत बसले होते म्हणे ! "

" होय. "

" बर नाही हें. नाही का ? "

" दुसर कुठल एखाद घाणेरड व्यसन असण्यापेक्षा हे व्यसन बरं. नाही का ? "

मोहनन एकदम कान टवकारले काय ऐकत होता तो ?

" बर कसल ! व्यसन ते व्यसनच आणि त्यांचं तें लेखन ! कामाकडेसुद्धा नीट लक्ष नसत म्हणे त्याच त्याचे साहेबच मला सागत होते पर्वा. चागलं मन लावून काम कराव, बढती मिळवावी, एक दिवस हेडक्लार्क व्हाव– काय मिळणार आहे गोष्टी लिहून ? "

" कीर्ति मिळते ना त्याना खरंच गगूभाऊजी, आपल्याला कल्पना नाही, पण लेखक म्हणून इकडे फारच मान आहे वाचकाची त्याना आलेली पत्र वाचली की मूटभर मास चढत मला. आणि अजून काय झालय् ? थोडे दिवस थाबा, मग सगळीकडे एक बडे लेखक म्हणून ह्याच नाव गाजत असलेलं तुम्हाला दिसून येईल – पैसा काय ? सारेच कमावतात, पण कीर्ति एखाद्यालाच मिळते ! "

" आणि अलीकडे मोहनराव सिगारेटीहि फार ओढतात, – बरं नाही ते ! "

" भाऊजी, आता दिवाळी आली ना ? त्याना दहापधरा तरी गोष्टी लिहून निरनिराळ्या मासिकाना पाठवल्या पाहिजेत सपादकाचा सारखा तगादा लागलाय् त्याच्या माग मग मनाला विरगळा म्हणून सिगरेटी ओढाव्याच लागतात त्याना कलावताला अस एखाद व्यसन लागतच ! "

" मग काही भाडण नाही ना झाल तुमच ? "– गंगूनानाच्या स्वरांत भयकर निराशा प्रतीत होत होती.

" भाडण ? छे ! असा सोन्यासारखा नवरा मिळाला तर त्याच्याशीं कोण भाडेल ? "

आँ ? सोन्यासारखा नवरा ? मोहनचा आपल्या कानावर विश्वासच बसेना. काय ऐकत होता तो ? मघा आपणाला तुच्छतेन टाकून बोलणारी, आपल्याशी लग्न केल म्हणून दैवाला दोष देणारी, ती सुलूच का हे सार बोलते आहे ? खरच बायको म्हणजे एक अजब प्राणी आहे बुवा ! आता एक बोलेल आणि लगेच दुसरच त्याच्या उलट काही बोलेल ! ––

पण त्याच्याच्यान आता विचार करत बाहेरच उभ राहण शक्य नव्हत. तो एकदम आत गेला आणि सुलूकडे पहात राहिला. पण तो दिसताच सुलू पुन्हा कठोर झाली. ती म्हणाली, " काय ? आज क्लबात पत्ते कुटायचे नाहीत वाटतं ? "

पण मोहनन तिच्या बोलण्याकडे दुर्लक्षच केल बायको हा प्राणी एकदा उलट बोलतो आणि एकदा सुलट बोलतो, हे त्याला आता समजून चुकल होत. पुष्पासारखी त्याच्या बोलण्यात सुसगति नसते मुळूच आपणावर पूर्वीइतकच प्रेम असल्याच पाहून त्याला इतका आनद झाला की गगूनानाना जेवायला ठेवून घेऊन तो साजरा करावा, अस त्याला वाटल त्यान गगूनानाकडे पाहिल त्याचा निराश चेहरा पाहून त्याला गमत वाटली आणि थोडीशी कीवहि आली. त्यानं विचारल, " काय गगूनाना, जेवण झाल का ? "

" नाही. " खोल आवाजात गगूनाना उत्तरले.

" मग आता इथच जेवा " सुलूकडे हर्षोत्फुल्ल डोळ्यानी पहात मोहन म्हणाला, " पहा तर खर, सुलू कसा फक्कड स्वयपाक करते ती ! "



# नर्स ताराबाई !

त्या दिवशी मध्याकाळी ऑफीस सुटल्यावर आमच्या गल्लीच्या नाक्यावरील इराण्याच्या हॉटेलात मी 'अिव्हिनिग न्यूज' वाचीत बसलो होतो समोर 'पावणा' चहा व खारी बिस्किटे होती. त्याचा सावकाश समाचार घेत जगातल्या ताज्या घडामोडीवरून मी नजर फिरवीत होतो, तोच माझ्या पाठीवर एक जोराची थाप बसली आणि मी दचकून मागे वळून पाहिले !

"ओहो, बन्या ! अरे ओळखलच नाही की मीं तुला पहिल्यान ! हृ. मला वाटल, की जवाहरलाल नेहरूच माझ्यासमोर उभे आहेत कीं काय ?"

खादीचा लाब शर्ट, त्यावर एक बडी, डोक्यावर पाढरीशुभ्र किचित् कलती टोपी आणि सोगा सोडलेले धोतर ह्या पोषाखातली एक कृश व्यक्ति माझ्या-समोर उभी होती मी वरीलप्रमाणे बोलून त्याने पुढे केलेला हात आपल्या हातात दाबला आणि आनदाने म्हणालो, "हृ बैस काही चहा वगैरे घेतोस ?"

"चालेल" आपल्या हातातील पोट फुगलेली बॅग बाजूच्या खुर्चीवर ठेवीत बन्या म्हणाला नतर कपाळावरचा घाम पुसून त्याने 'हुश्श' केले आणि खुर्चीच्या पाठीला नीट टेकून बसून 'आता आपण पुढील सभापणाला तयार आहोत' अशी त्याने जणू सूचनाच दिली

तसे पाहू गेले असता शाळेत असताना बन्याची आणि माझी विशेषशी मैत्री नव्हती आपल्या खोडकर व उनाड स्वभावामुळे तो जसा सर्व शाळेला माहीत होता तसाच मलाहि होता परतु मनुष्याचा स्वभाव असा असतो, की त्याला आपल्या गावचे आणि लहानपणातले साध्या ओळखीचे लोक बऱ्याच वर्षांनी आणि तेहि मुबईसारख्या परक्या शहरात भेटले, तर आपला एखादा अगदी जीवश्चकंठश्च मित्र भेटल्याइतका त्याला आनद होतो. तसेच माझेहि त्या दिवशीं झाले व त्या आनदात मी बन्याचा पाहुणचार करू लागलो.

"काय बनोबा, इकडं कुठ ?" मीं विचारले.

"काय करणार बाबा ! आलों झालं धंद्यानिमित्त !" —बन्या.

" कोणता धंदा करतोस ? "

" विमा एजट आहे मी. "

" बाकी तुझ्यासारख्या धडपडचा माणसाला विमा एजंटाचा धंदा चागलाच साधत असेल, नाही ? "

" ह हातातोडाची गाठ पडते आपली, इतकंच. बर,तू काय करतोस इथं ? "

" मी ' ब्लॉकहेड, एम्टीहेड आणि ब्लॉकहेड ' ह्या सॉलिसिटर्सच्या फर्ममध्ये आहे नोकरीला. "

" लग्नबिग्न ? "

" झालय् की "

" वा ! आल पाहिजे मग वहिनीच्या हातचा चहा घ्यायला एकदा तुझ्याकडे. ह्या इराण्याच्या चहाला थोडीच ती लज्जत येणार ? " हसतहसत बन्या म्हणाला.

" ये की, अवश्य ! "

" स्वतत्र बिऱ्हाड थाटल आहेस वाटत ? "

" स्वतत्र म्हणजे .. माझी आतेबहीण राहाते आमच्याबरोबरच. मास्तरीण आहे ती. नाहीतर राजाराणीचा ससार. . . "

मी असे म्हणतो आहे तो मला मध्येच अडवून व रस्त्याकडे बोट दाखवून बन्या एकदम म्हणाला, " ती विधवा बाई बघितलीस ? "

" ह " मी चट्कन् तिच्याकडे दृष्टि टाकून उद्गारलो

" नीट बघून ठेव " त्याने मला गभीरपणाने इपारा दिला.

" का ? " तिच्याकडे न्याहाळून पाहात मी प्रश्न केला.

" पाहून तर घे . . . . तिच्यामाग मोटा इतिहास आहे ! " सिनेमातल्या खलपुरुषाच्या आवाजात बन्या उत्तरला

" इतिहास ? "

" हो. इतिहास ! तू ओळखतोस तिला ? " त्याने विचारले.

" अ. . नाही " मी गोधळून उत्तर दिले.

" नीट बघून घे तिला ! " त्याने परत हुकूम सोडला.

त्या दूरदूर जाणाऱ्या बाईचे बन्याच्या आज्ञेवरून मी निरीक्षण करीत

होतो. ती वयाने तीसबत्तीस वर्षांची असून वर्णाने निमगोरी होती तिचा बाधा प्रमाणबद्ध होता तिने मानेवर सैलसा अबाडा सोडला होता. तिच्या ठसठशीत आणि बुध्दिमत्तानिदर्शक नाकडोळ्याचा जसा मनावर परिणाम होई, तसाच तिच्या कुंकू नसलेल्या कपाळाकडे पाहून काळाच्या निर्दयतेचाहि होई. पोपटी रगाचे लुगडे चापचोपून ती नेसली होती पायात साध्या चपला होत्या हातात एक मनीबॅग व आखूड दाड्याची बायकी छत्री होती तिच्या पोपाखावरून किवा चालण्याच्या ढबीवरून ह्या बाईच्या पूर्वायुष्यात काही खळबळ उडविणारा ' इतिहास ' घडला असेल हे मला शक्य वाटेना. " छे ही बाई तर सभ्य दिसते ! " मी माझी शका बन्याला बोलून दाखविली

" अगदी पूर्वीसारखाच भोळा आहेस तू अजून गजा ! अरे, ह्या जगात दिसत तस नसत ! " एक सबध खार बिस्किट तोडात भरून बन्या म्हणाला. " गोगलगाय नि पोटात पाय ! ह्या बाईचा इतिहास ऐकलास तर बाहेरून इतक्या शहाजोग दिसणाऱ्या बाईच्याकरवी अशी कृत्य घडून आली तरी कशी याचच तुला आश्चर्य वाटेल ! आणि त्याबरोबरच त्या करुण इतिहासान तुझं मन पिळवटून निघेल ! "

" च च् ! " मी उदगारलो बन्या म्हणजे बायकाच्या नावागावाचें आणि इतिहासाचे चालते बोलते रजिस्टरच होते तेव्हा बन्या आता आपल्या अगाध माहितीच्या सागरातून कोणती ' रत्ने ' काढून दाखवून माझे डोळे दिपवून टाकतो इकडे माझी सर्व उत्सुकता लागून राहिली होती.

" एक — " घसा खाकरून बन्याने सजयाची गेट आणून तिचा इतिहास सागावयास सुरवात केली —

" सुखवस्तु आईबापाची ही एकुलती एक मुलगी तिच माहेरच नाव ' तारा '. आपण तिला आता ह्याच नावान सबोधू तारा लहानपणापासून फार हुषार आणि गोड स्वभावाची होती आईबापाची तर ती लाडकी होतीच; पण शेजाऱ्यापाजाऱ्याचीसुध्दा ती अतिशय आवडती होती जसजशी ती वयात येऊं लागली तसतशी तिच्या हुषारीची आणि सौदर्याची शुक्ल पक्षातील चद्राप्रमाणं वाढ होऊ लागली शाळेत तिचा आभ्यासात आणि खेळातहि पहिला नबर असे. रगान निमगोरी असली तरी आपल्या रेखीव नाकडोळ्यामुळ आणि सुदृढपणा-

मुळं सर्व मुलीत ती उठून दिसे. तिच्या मुखावर नेहमी आनंद ओसंडत असे. आता जे तू तिला पाहिलंस त्यावरून तुला तिच्या तारुण्यातल्या सौंदर्याची एकशतांश-सुद्धा कल्पना येणार नाही ! अशी ही सुंदर, गुणी आणि बुद्धिमान मुलगी कोणाच्या गळ्यात माळ घालणार ह्याविषयी सर्वांनाच कुतूहल वाटे. ''

तो थोडासा थांबला आणि चहाचा एक घोट घेऊन, घसा ओला करून पुढे बोलू लागला –

'' आपल्याकडे मुलगी खपवायची म्हणजे तिच्या बापाला कोण यातायात पडते ! पण तारेच्या बाबतीत उलट अनुभव आला. चांगल्याचांगल्या हुशार, देखण्या मुलांचे श्रीमंत वरपिते आपण होऊन तिच्या वडिलांच्या घराचे उंबरठे झिजवू लागले पण ताराचं लग्न जमवणं तिच्या आईबापांनी सर्वस्वी तिच्याच हाती सोपवलं होतं. आणि तिनं शेवटी जो वर पसंत केला तो पाहून तर प्रथम सर्वांनी आश्चर्यानं तोंडात बोटंच घातली सर्व श्रीमंत तरुणांना झिडकारून तिनं एका देखण्या, दिलदार, पदवीधर पण गरीब देशभक्ताशी लग्न केलं. पहिल्यानं सर्वांना ह्या तिच्या निवडीचं आश्चर्य वाटलं तरी नंतर अनुभवानं 'समसमा संयोग की जाहला ' म्हणून त्यांनी तिच्या पसंतीला माना डोलावल्या. तारानं आपल्या संसाराची पहिली दोनतीन वर्षं मोठ्या स्वर्गसुखात काढली

'' आतापर्यंत तारेच्या वाट्याला नुसतं सुखच वाढून ठेवलं होतं परंतु नंतर ब्रह्मचाला काय वाटलं कुणास ठाऊक ! त्यानं तिला दुर्दैवाचे जबर तडाखे द्यायला सुरवात केली की त्यापुढे ' मी मी ' म्हणणारे पुरुषसुद्धा गांगरून गेले असते ! तिचे आईबाप तीर्थयात्रा करीत असता बिहारच्या भूकंपात बळी पडले तारेला ही बातमी कळली तेव्हा तिच्याहि मनात मोठाच भूकंप झाला आणि तिच्या सुखाचा जणू पायाच ढासळला ! तिचा नवरा वकील होता म्हणजे देश-भक्ति करून फावलेल्या वेळात तो वकीली करीत असे तो हुषार होता व त्यानं आपल्या धंद्यात लक्ष घातलं असतं, तर तो आज लाखोपति झाला असता. पण तारेच्या नशिबात येवढं होतं कुठं ? गांधीच्या चळवळीत त्यानं सत्याग्रह केला आणि एक वर्ष तुरुंगवास भोगला.

'' एखादं मांजर उंदराला मारण्यापूर्वी जसं त्याच्याशी खेळतं आणि त्याचे हालहाल करतं, तसाच तारेच्या बाबतीत दैवाचा निर्दय खेळ चालला होता. तुरुंगात शिरलेला तारेचा नवरा आणि तुरुंगातून बाहेर पडलेला तारेचा नवरा

एकच नव्हता. त्याचा उमदेपणा पार नाहीसा झाला होता. आनदी स्वभावाची जागा त्रासिकपणानं घेतली होती. एवढच नव्हे तर बरोबर क्षयाचे जतु घेऊन तो तुरुगाच्या बाहेर पडला होता ! तुरुगातून बाहेर पडताना त्यान ह्या जगाच्या मोठ्या तुरुगातून बाहेर पडण्याचीहि तयारी दाखविली होती जशी काही. "

आपल्या कोटीबाज वाक्यरचनेने बन्याला स्वत चेच कौतुक वाटल्यासारखें दिसले. गोष्ट सागण्याची त्याची शैली आकर्षक होती आणि मी सर्व अवधान लावून तो तारेचा ' इतिहास ' ऐकत होतो. थोडासा विचार करून तो पुढे सागू लागला- " तारेन डॉक्टराकडे पाण्यासारखा पैसा खर्च केला निरनिराळी हवेची ठिकाण झाली आपल्या नवऱ्याची शुश्रूषा करण्यात तारेन उग्र तपश्चर्या केली; दिवसचे दिवस उपास काढले पण यमराज तिच्या ह्या तपश्चर्येन प्रसन्न झाला नाही एक दिवस येऊन त्यान तारेच्या कपाळावरील कुकू पुसून टाकल ! आता तर तिच्यावर दु खाचा डोगरच कोसळला ! या अफाट जगात आता ती अगदी एकटी होती ! आईबापानी तिला थोडासा पैसा ठेवला होता, पण नवऱ्याच्या आजारपणात तिन इतका पैसा खर्च केला होता की तिला आता गरिबीच आली होती केव्हा केव्हा वैतागान तिच्या मनात आत्महत्येचे विचार थैमान घालीत! पण तारेची मनोरचनाच अशी होती की तिच्या हातून आत्महत्या घडण शक्य नव्हत ती वृत्तीन लढाऊ होती वाटेल त्या हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या तरी पराभव कबूल करायला तिच मन तयार नव्हत प्रतिकूल परिस्थितीशी ती एकटीच झगडत राहिली. तिन नर्सिंगचा कोर्स घेतला आणि यथाकाल ती नर्स म्हणून बाहेर पडली "

" नर्स ? " मी आश्चर्याने विचारलें

" हो नर्स ! " बन्या ठासून म्हणाला.

" मला वाटल, ती मास्तरीण झाली असेल म्हणून ! " मी म्हटले.

बन्याने जराशा सशयाच्या नजरेने माझ्याकडे निरखून पाहिले आणि माझी आणखी विरोध दर्शविण्याची इच्छा नाही अशी खात्री होताच आपली गोष्ट त्याने पुढे चालू केली.

" आता विचार कर, तारेसारखी तरुण, सुस्वरूप, निराधार स्त्री .... परिस्थिति गरिबीची,त्यातून नर्सच्या धद्यामुळ अनेकाशी येणारा तिचा सबंध!

ह्या जगांत कांही लोक अशा स्त्रियाना आपल्या जाळ्यात अडकविण्यासाठी टपलेले असतात ! मग पुढ काय झाल असेल ह्याची कल्पनाच केलेली बरी ! "

" काय झाल पुढ ? " छाती धडधडत असताना मी प्रश्न केला.

" काय होणार ? एका प्रसिद्ध डॉक्टरानी तिच्यावर आपले मोहपाश टाकले. त्यातून सुटण्याचा तिने खूप प्रयत्न केला. आपल्या दिवगत नवऱ्याच्या आठवणीतच आपली सर्व दु ख बुडवून टाकण्याचा तिने आटोकाट प्रयत्न केला ! परंतु विचार कर – सर्व जग, सर्व नशीब विरुद्ध एक निराधार अबला ! ह्या लढ्यात कोण विजयी होणार ? ".

असा प्रश्न करून बन्या किंचितसा थाबला आणि म्हणाला, " मग जें व्हायच तेच झाल तिला पढरपूरच्या वाऱ्या कराव्या लागल्या हळूहळू तिच मनहि मेलं आणि एका अध पातातून दुसऱ्या त्याहीपेक्षा मोठ्या अध पाताच्या गर्तेत ती लोळू लागली व त्यातच सुख मानू लागली "

" हू ! " मी एवढेच उद्गारलो त्याच्या गोष्टीचा जरी माझ्यावर विशेषसा परिणाम झाला नव्हता तरी गोष्ट सागण्याच्या त्याच्या धाटणीचें मी कौतुक करीत होतो

इतक्यात आपल्या गळ्याच्या शिरा फुगवून बन्या एकदम ओरडला, " साग ! तारेच्या ह्या सगळ्या आपत्तीना कारण काय ? महाराष्ट्रातील सगळे लेखक उत्तर देतील – ' समाज '. समाजसुधारक म्हणतील – ' आपल्यात पुनर्विवाहाची चाल नाही म्हणून. ' पुराणमतवादी म्हणतील – ' तारा अस्सल आर्य पतिव्रता नव्हती म्हणून ' पण तू सुज्ञ आहेस नीट विचार कर तारेच्या ह्या सर्व दु खाच कारण काय ? ह्या आपत्ति तिला टाळता आल्या नसत्या काय ? "

गोष्ट सागून झाल्यावर तात्पर्य काढतेवेळच्या त्याच्या आवेशाकडे पाहून मी तर गारच झालो ! त्याला काय उत्तर पाहिजे होते मला काहीच कल्पना होईना ! मी तसाच स्वस्थ बसून राहिलो

" होय ह्या सर्व आपत्ति टाळता आल्या असत्या दुर्दैवान तारेला जे तडाखे दिले तिथ माणसाचा काही इलाज नव्हता " जराशा खालच्या आवाजात बन्या बोलू लागला, " परतु तारेला सध्याच्या काळात सुखासमाधानान, मान वर करून, अब्रून राहण्याची व्यवस्था करण माणसाच्या हातात खास होतं.

तिच्या नवऱ्यानं जर दूरदर्शीपणा दाखलला असता तर तिची अशी वाताहात आज झाली नसती ! ''

'' ती कशी ? '' मी नम्रपणाने विचारले.

'' ह्या सर्व दुःखमालिकेच कारण एकच. गरिबी! नवऱ्याच्या मृत्यूनंतर तारेला आलेली गरिबी ! आणि ही गरिबी टाळण्याचा उत्तम आणि सोपा मार्ग म्हणजे विमा उतरण. तूच सांग, तारेच्या नवऱ्यानं जर आपल्या आयुष्याचा विमा उतरला असता, तर तारेला आपलं वैधव्यावस्थेतलं आयुष्य कुणाच्याहि तोंडाकडे न पाहाता सुखासमाधानात काढता आलं नसतं काय ? '' एवढं बोलून तो माझ्या उत्तराची वाट पाहू लागला. एवढ्या भयंकर इतिहासाचे पर्यवसान अशा साध्या आणि किंचित् मिळमिळीत तात्पर्यात झालेले पाहून मी जरा गोंधळूनच गेलो होतो.

'' हो. तिच्या नवऱ्यानं जर पांचएक हजाराचा विमा उतरला असता, तर तारेच्या आयुष्याचा असा बोजवारा खात्रीनं उडाला नसता. '' मी कबूल केले.

'' शाबास गजा. तू सुज्ञ आहेस. '' असे म्हणून त्याने ती आपली ढेरपोटी बॅग उघडून त्यातून दोनतीन फॉर्म्स बाहेर काढले आणि ते माझ्यासमोर ठेवीत तो म्हणाला, '' भर तर हे फॉर्म्स. कितीचा विमा उतरतोस ? पांच हजार ? ''

त्याच्या ह्या कृतीने मी तर चारी मुंड्या चीत झालो! काय करावे हेच मला समजेना ! पण माझ्या ह्या गोंधळलेल्या मनःस्थितीचा पुरेपूर फायदा करून घेण्याच्या उद्देशाने मला विचार करण्यासाठी क्षणाचीहि फुरसत मिळू न देता बन्याने माझ्यावर आणखी एक निकराचा हल्ला चढविला.

'' आपल्या पश्चात् आपल्या कुटुंबाची तरतूद करणं हे प्रत्येक समजस माणसाचं कर्तव्य आहे. तुझ्या बायकोवर तुझ्या पश्चात् त्या तारेसारखे प्रसंग येऊ नयेत अशी तुझी इच्छा असेल, तुझ्या बायकोवर तुझं खरखुरं प्रेम असेल, तर आत्ताच्याआत्ता आपला विमा उतरवून घेणं हे तुझं कर्तव्य ठरतं. विचार कसला करतोस ? हं, तुझं वय किती ? .... पंचवीस ? ठीक. '' नंतर पिवळ्या कव्हरचे एक पुस्तक भरभर चाळीत तो म्हणाला , '' म्हणजे तुला दर हजारी पंचेचाळीस रुपये बारा आणे तीन पै इतका सहामाही किंवा एक्याण्णव रुपये आठ आणे सहा पै इतका वार्षिक हप्ता भरावा लागेल. दर हजारी वार्षिक हप्त्यावर बारा आणे सूट .'' तो आता अगदी पढवलेल्या पोपटाप्रमाणे बोलू लागला होता.

" शिवाय दर हजारी बावीस रुपये वार्षिक बोनस . दुसरी कोणतीहि कंपनी इतका बोनस देत नाही विमा उतरल्यापासून दोन वर्षांच्या आंत मृत्यु आल्यास दाम-दुपटीची आकर्षक आणि नावीन्यपूर्ण योजना ."

त्याची ही मरबत्ती चालू असता मी आपल्या मनाचा तोल कसाबसा सावरला होता मी म्हणालो, " हे बघ, आपण माझ्या घरी जाऊं आणि तिथं स्वस्थपणान हा फॉर्म भरू. "

बन्या एकदम कबूल झाला. मी ' नको, नको ' म्हणत असता त्यानें इराण्याचे पैसे चुकते केले आणि आम्ही माझ्या घरचा रस्ता चालू लागलो. सर्व रस्त्यानें त्याचें आपल्या कपनीचे गुणगान आणि इतर कपन्याचे दोप-दिग्दर्शन चालू होतें

माझ्या ब्लॉकपाशी येताच मी दारावरची घटा दाबली दारावर माझ्या नावाची एक पाटी होती आणि तिच्या शेजारीच दुसरीहि एक पाटी होती बन्याने त्यावरील नाव वाचून प्रश्न केला, " या मिसेस दयाबाई माळशे, बी ए कोण ? "

" तीच माझी आतेबहीण मास्तरीण आहे ती जिच्याविषयी मी मघा आमच्याकडेच राहाते म्हणून सांगितल ती "

एवढयात दरवाजा उघडला गेला आणि आम्ही आत जाऊन एका टेबला-भोवती खुर्च्यांवर बसलो बन्याने एक फॉर्म घेऊन त्यावर माझे नाव वगैरे लिहा-वयास सुरवात केली

" दयाताई, जरा बाहेर ये पाहू. " बन्या फॉर्म भरीत असताना मी आतल्या खोलीकडे पाहून हाक मारली.

" छे छे आता चहा वगैरे काही नको पोट कस अगदी गच्च भरलं आहे " माझी हाक ऐकून पोटावरून हात फिरवीत बन्या म्हणाला.

इतक्यात आतल्या दरवाजातून पोपटी रगाचे लुगडे नेसलेली दयाताई बाहेर आली आणि तिच्याकडे लक्ष जाताच बन्याने ' आ ' च वासला.

" दयाताई .. छे, नर्स ताराबाई, हा माझा लहानपणचा वर्गबधु—बनोबा भावे. " दयाताईला उद्देशून एवढे बोलल्यावर बन्याकडे वळून मी म्हणालो, " आणि बन्या, ही माझी आतेबहीण . . . पण तू तिला चागलीच

ओळखतोस. कारण तुला तिचा सर्व ' इतिहास ' माहीतच आहे, नाही का ? " मी त्याच्याकडे रोखून पाहात प्रश्न केला.

" म.. म . म्हणजे . ? ह्या तुझ्या आतेभगिनी की काय ? " आपले फॉर्म्स गडबडीने गोळा करीत खुर्चीवरून उठताना बन्या अडखळत म्हणाला

" अस रे काय करतोस, गजाभाऊ? मला ' तारा ' काय म्हणतोस ? हे नवीनच नाव कधीपासून ठेवलस बाबा ? आणि मी मास्तरिणीचा धदा सोडून नर्स रे कधीपासून झाले ? " आमच्या वर्तणुकीमुळे गोधळात पडलेल्या दया-ताईने मला विचारले

" मला ह्या आमच्या बन्यान आत्ताच सागितल, की तुझं नाव ' दया ' नसून ' तारा ' आहे म्हणून नि तू मास्तरीण नसून नर्स आहेस म्हणून. एवढच नव्हे, तर तू आतापावेतो आमच्यापासून चोरून ठेवलेला तुझ्या पूर्वायुष्याचा सर्व इतिहासहि त्या बन्यान मला इत्थभूत सागितला आहे नाही का बनोबा ? " मी म्हणालो.

" हा रे काय गोधळ ? " दयेने जरा रागावून विचारले

" थाब सागेन तुला नतर सर्व आधी मला ह्या बनोबाचा समाचार घेऊ दे. " असे म्हणून मी बन्याकडे वळलो, " बन्या, वाटेल त्या स्त्रीविषयी वाटेल ते बरळायला . "

" छे छे ! गजा, ते सर्व काल्पनिक होत विम्याच महत्त्व तुझ्या मनावर ठसवून मला तुझ गिऱ्हाईक गठवायच होत मला काय कल्पना की रस्त्यात दिसलेली ती विधवा स्त्री म्हणजे तुझी आतेबहीण असेल म्हणून ? माझी चूक झाली . . . " गयावया करून दरवाजाकडे जाताजाता बन्या विनवू लागला. पण इतका वेळ दाबून ठेवलेला माझा सताप आता अनावर झाला होता. त्याच्या मागोमाग जाऊन तो माझ्या मनातला सताप माझ्या लाथत उतरवून मी त्याच्या पेकाटावर चागलाच ठसवला आणि म्हणालो, "सर्व काल्पनिक होत काय ? मग ही लाथहि काल्पनिकच समज ! थाब लेका, तुला आता चागलाच धडा शिकवतो . . . "

पण त्याचे नशीब शिकदर म्हणून तो हा हा म्हणता पसार झाला ! नाही-तर त्याच्या आयुष्याच्या विम्याचे पैसे त्याच्या बायकोला थोड्याच दिवसात मिळाले असते !

● ● ●

# श्री. र. गो. फाटक !

संध्याकाळी पाचाचा सुमार होता. कपडे चढवून मी दवाखान्यांत जाण्याच्या तयारीत होतो. इतक्यात दारावरची घटा वाजली.

कोण आल असाव ह्याविषयी विचार करीत मी दरवाजा उघडला. पाहतो तर आमच्या गावचे प्रमुख साहित्यिक रा रा. वा. श्री देशपाडे समोर उभे.

त्याना पहाताच मी मनातून जरासा चरकलोच कारण वा श्री दे हे काही माझे पेशट नव्हते ते कधी माझ्याकडे येत ते कसल्या तरी कार्यासाठी वर्गणी मागण्यापुरतेच तेव्हा त्याना बघून मला जरासा निरुत्साह वाटला असल्यास, त्यात नवल नव्हत

आणि तस मला वाटण्यास आज दुसरहि एक कारण झाल होत. आज सकाळी अशाच एका कारणासाठी माझी आणि एका पाचाच्या नोटेची फारकत झाली होती आता ती पाचाची नोट पुढे मागे परत मिळण्याची मला आशा होती, हे खर पण आणखी कोठल्याहि कार्याला मदत करण्याची निदान आज तरी माझी इच्छा नव्हती

पण, मनात क्षणार्धात येऊन गेलेले हे विचार चेहऱ्यावर उमटू न देता, किंचितस हसून मी वा श्री दे ना प्रश्न केला,

" ओहोहो, आज इकडे कुठे ? "

" आपल्याकडेच. जरा बाहेर चला. "

" कुठे ? "

" एक पेशट पहायचा आहे. "

" कोण आजारी आहे ? "

" पुण्याचे साहित्यिक फाटक माहीत असतीलच तुम्हाला. त्याना जरा बर नाही. "

" कोण ? फाटक ! म्हणजे ते आज गेलेच नाहीत का पुण्याला ? " मी जराशा आश्चर्यान विचारलं.

" नाही, प्रकृति बिघडल्यामुळं त्यानी जाण रहित केल. तुमची त्यांची ओळख आहे वाटतं ! "

" ओळख म्हणजे—हो. आज सकाळीच झाली आमची ओळख. "

हा वेळपावेतो माझी औषधाची बॅग मी तयार केली होती. ती वा. श्री दे. च्या हातात देऊन आम्ही फाटक रहात असलेल्या ' केशवाश्रमा ' चा रस्ता चालू लागलो.

सुप्रसिद्ध लघुकथालेखक श्री. र. गो फाटक हे तुम्हाला ऐकून माहीत असतीलच. घरगुती वातावरणाच्या गोष्टी लिहिण्यात त्याचा अगदी हातखडा आहे. मी त्यांच्या गोष्टीचा मोठा चहाता असलो तरी त्याच्याशी प्रत्यक्ष ओळख होण्याची सधि मला अजूनपर्यंत मिळालेली नव्हती. तशी सधि आज सकाळी अगदी अचानक मला लाभली होती—आणि तीहि मोठ्या मजेदार रीतीन

रस्त्यान चालता चालता आज सकाळचा तो प्रसग माझ्या दृष्टीसमोरून जाऊ लागला.

साडेअकराबाराचा सुमार असेल दवाखान्याचं काम आटोपून सकाळची वर्तमानपत्र वाचीत मी बसलो होतो. स्थानिक शारदोपासक मडळाच वार्षिक स्नेहसमेलन, पुण्याहून मुद्दाम आमत्रण करून आणलेल्या र गो फाटकाच्या अध्यक्षतेखाली कालच पार पडल होत त्याच्या अध्यक्षीय भाषणाचा वृत्तात वाचण्यात मी गढून गेलो होतो

किती सुदर भाषण केल होत त्यानी. रस्त्यान चालताना फर्लांगाफर्लांगावर पी डब्ल्यू डी चे पाढरा रग फासलेले दगड आढळावेत, त्याप्रमाणे कसात 'हशा ' आणि ' टाळ्या ' हे शब्द त्या वृत्तातात थोड्या थोड्या अतरावर विखुरलेले होते.पण तो वृत्तात वाचताना माझ्या मनाला आनद वाटत नव्हता. एका अत्यवस्थ रोग्याकडे अडकून पडल्यामुळे मला मनात फार असूनहि फाटकाच्या भाषणाला काल हजर राहता आल नव्हत माझ्या आवडत्या लेखकाच एक सुदर भाषण ऐकण्याची आलेली सधि फुकट गेल्याबद्दल, तो वृत्तात वाचताना माझ्या मनाला सारखी चुटपुट लागून राहिली होती.त्या वेळी आम्हां डॉक्टराच्या धद्याचा मला चागलाच राग आला होता. एखादा कार्यक्रम ठरवावा, आणि ऐन त्याचवेळी एकाद्या पेशंटकडून बोलावण याव, हा तर माझा अगदी नेहमीचाच अनुभव होता.

" डॉक्टर आहेत का ? " तो वृत्तात वाचीत असता बाहेरच्या खोलीत उच्चारलेले हे शब्द मला ऐकू आले.

" आहेत. काय काम आहे ? " माझ्या कपाऊंडरन विचारलं.

" जरा खामगी काम आहे त्याच्याशी ! "

त्या गृहस्थाला कपाऊडरन माझ्या खोलीत आणून सोडल आन येताच त्यान मला नमस्कार केला आणि विचारल, " आपणच का डॉ खरे ? "

" हो. बसा ! "

" आपल्याकडे माझ थोड खासगी काम आहे " खुर्चीवर बसता बसता तो गृहस्थ म्हणाला.

आम्हा डॉक्टराकडे ' खासगी ' कामासाठी येणाऱ्या लोकाचे दोन प्रकार असतात. एक प्रकार ' गुप्त ' रोग झालेल्याचा आणि दुसरा मदतीची याचना करावयास येणाऱ्याचा तो गृहस्थ खुर्चीवर बसेपर्यंत मी त्याची पाहणी करून घेतली. गृहस्थ चागला गोरागोमटा, बाधेसूद आणि रुबाबदार दिसत होता डोक्यावर बारीकशी काळी टोपी होती आणि ती कलात्मक रीत्या किंचितशी कलती ठेवली होती. तिच्याबाहेर दिसणारे केस एकाद्या चित्रातल्याप्रमाणे काळेभोर आणि कुरळे होते अगात निळचा ब्लेझरचा कोट होता. खाली पाढरशुभ्र तलम धोतर होत. पायात नुकतेच पॉलिश केल्याप्रमाणे चकचकीत दिसणारे पपशू होते.

त्या गृहस्थाच्या एकदर झकफक रुबाबावरून तो मदत मागावयास येणाऱ्याच्या वर्गातला नसावा, असा मी तर्क केला अर्थात्, मग तो डॉक्टराना भरपूर पैसे देणाऱ्या ' गुप्त ' रोग झालेल्याच्या वर्गातला असावा, असा विचार माझ्या मनात आला, आणि मनातून मी जरा खूष झालो.

" ह. काय काम आहे तुमच ? " वर्तमानपत्र बाजूला ठेवून देत मी विचारल.

" अस पहा," तो गृहस्थ खुर्चीवर ऐसपैस बसून म्हणाला, " माझ आपणाशी थोडस खासगी काम आहे. " नतर जरास चाचरत तो म्हणाला, " मला आपणांकडून थोडचा आर्थिक मदतीची अपेक्षा आहे. "

येवढ्या रुबाबात ' खासगी ' कामासाठी माझ्याकडे आलेला मनुष्य ' गुप्त ' रोग झालेला नसून अखेरीस भीक मागावयास आलेलाच निघाला

हे पहाताच माझी जराशी निराशा तर झालीच पण त्या माणसाचा मला रागहि आला. कपड्यावरून श्रीमंत दिसणाऱ्या माणसाला मदतीची जरूर का लागावी, हेहि मला समजेना. माझ्या मनातल्या ह्या नाना तऱ्हाच्या विचाराच प्रतिबिब बहुतेक माझ्या चर्येवर उमटल असाव कारण तो गहस्थ एकदम म्हणाला, " माझी ही विनंति ऐकून तुम्हाला आश्चर्य वाटेल,हे मी जाणून आहे पण परिस्थितीच अशी विचित्र आली आहे की मला याचकाची भूमिका स्वीकारावी लागत आहे डॉक्टरसाहेब, मदत मागत फिरणाऱ्यापैकी मी नाही. पण आज अडचणीत सापडल्यामुळे मला ह्या मार्गानं जाव लागल आहे . . . फार नाही, मला फक्त पाच रुपयाची जरूर आहे. "

इतक्या भारी पोषाखातल्या माणसान मदत मागायला याव, ह्याच मला वाटलेल आश्चर्य अजून कमी झालेल नव्हत निरनिराळया सबबी सागन मदतीची याचना करावयास येणाऱ्या लफंग्यापैकीच हा कोणीतरी असावा, अशी मला शका आली मी म्हणालो, " हे पहा मिस्टर, ज्याना मदत करावीशी मला वाटते, त्याना मी आपण होऊन आपल्या शक्तीप्रमाणे मदत करीत असतो. तुम्हाला मी स्पष्टच सागतो. मी तुम्हाला काहीएक मदत करणार नाही "

" पण माझ म्हणण तर जरा ऐकून घ्याल ? "

तो गृहस्थ बोलू लागला पण त्याला मध्येच अडवून मी म्हणालो, " अहो, असे लोक आमच्याकडे पुष्कळ येतात. प्रत्येकाला जर मी मदत करू लागलो, तर लवकरच मला दवाखाना बद करून दिवाळं फुकाव लागेल इथ मी बसतो तो पैसे कमवायला, आल्यागेल्याला पैसे वाटायला नव्हे "

" पण . . . . "

" पण बिण काही नाही तुम्ही आजारी पडलांत तर तुम्हाला पाहिजे तर दोन दिवस मी औषध फुकट देईन. बस्स ! पण पैशाची गोष्ट काढू नका " असे कोणी मदत मागावयास आले असता द्यावयाच माझ ठराविक उत्तर मी दिल. पण ते त्या गृहस्थाला बरंच लागल्यासारखं दिसलं. थोडा वेळ तो गप्प बसून राहिला. मीहि फिरून श्री. र. गो. फाटकाच्या भाषणाचा वृत्तात वाचण्यात गर्क झाल्याचं सोंग आणू लागलो.

पण येवढ्यानं तो गृहस्थ माझा पिच्छा सोडीलसं दिसेना. तो बोलू लागला, " डॉक्टरसाहेब, माझी हकीकत एकदा ऐका आणि मग पाहिजे तर

अखेरीस तो सुवर्णाचा दिवस- किंवा अधिक समर्पक शद्बांत सांगावयाचे म्हणजे ती सुवर्णाची रात्र उजाडली. ज्या भव्य नाटकगृहांत नृत्याचा प्रयोग व्हावयाचा होता,त्याभोवती आज सकाळपासून ह्या अवाढव्य नगरीतील कलोपासक आणि सौदर्योपासक रसिकाची एकच हुल्लड उडून गेली.दुपारी तीनच्या आधीच सर्व तिकिटे खलास होऊन बऱ्याच रसिकाची दारुण निराशा झाली. आठ वाजताच सर्व नाटकगृह निरनिराळया जातीच्या,धर्मांच्या आणि देशाच्या रसिकवर्गातील प्रतिनिधींनी भरून गेलें. त्यांत आजतागायत पोषाख केलेले तरुण रसिक होते, इंद्रधनुष्याशी किंवा रंगीबेरंगी फुलपाखराशी स्पर्धा करूं पाहणाऱ्या साड्या नेसलेल्या रसिक तरुणी होत्या आणि देशोदेशीच्या कलाचा रसास्वाद चाखलेले पोक्त आणि अनुभवी वृद्धहि त्यांत होते समाजातील उच्च अभिरुचीच्या आणि सुसस्कृत वर्गाचा तो श्रोतृसमुदाय म्हणजे निव्वळ अर्क होता त्यात पारशी होते, गुजराती होते, मुसलमान होते, आणि चारदोन महाराष्टीयहि होते त्याबरोबरच राष्ट्राची सर्वांगीण उन्नति व्हावी म्हणून तनमनधन अर्पण करून अहर्निश झटणारे काही देशभक्त व देशसेविका यांनाहि मोठ्या मानाने पुढील रांगांवर आणून बसविण्यात आलें होते. शिवाय लोकमताचे कर्ते असे काही सपादकहि मोफतात आणून बसविलेले होते.

जसजसा घड्याळाचा काटा नवाकडे सरकू लागला, तसतशी प्रेक्षकवर्गाच्या उत्साहसागराला भरती येऊ लागली. हळूहळू सर्व नाटकगृहात शातता पसरू लागली. आपण आता थोड्याच वेळात कोणते स्वर्गीय दृश्य पाहणार, ह्याबद्दलच्या गोड हुरहुरीमुळे सर्व आबालवृद्ध प्रेक्षकाच्या रसिक हृदयाना गुदगुल्या होऊ लागल्या. रगभूमीवर टागलेला तो भव्य मखमलीचा पडदा केव्हा एकदा बाजूस सारला जातो, आणि आपण आपल्या सौदर्योपासक रसिक पण मर्त्य डोळ्याचे पारणे फेडून टाकतो असे प्रत्येकास होऊन गेले होते जो तो एकसारखा आपल्या घड्याळाकडे पाही आणि आजच ह्या घड्याळाला सावकाश चालायला काय झाले, असे पुटपुटत त्रासून ते आपल्या दृष्टीसमोरून दूर करी. सर्वांची सारखी चुळबूळ चालली होती.नवाला दहा मिनिटे—सर्वांचे लक्ष पडद्याकडे लागले. नवाला सात मिनिटे—स्तब्धता गंभीर होऊ लागली नवाला पाच मिनिटे-रंगभूमीवरून मंडळीच्या आर्केस्ट्राचे कर्णमधूर स्वर येऊन कानाना गुदगुल्या करूं लागले. नवाला तीन मिनिटे-जळलेल्या धुपाच्या मादक दर्पाने सर्व नाटकगृह भरून गेले. नवाला एकच मिनिट-नऊ !

तो भरजरी मखमलीचा भव्य पडदा गंभीरपणाने दुभंगला गेला. चक्रवाक आणि त्याची प्रिया यांच्यामध्ये अडथळा आणणारे पर्ण दूर सारलें जावें, त्याप्रमाणे वाटून प्रत्येकाने समाधानाचा सुस्कारा टाकला. सर्वांची दृष्टि त्या राजशाली रंगभूमीवर खिळून राहिली.

नवाचे ठोके पडतांच ऑर्केस्ट्राचे स्वर एकदम मोठे झाले. एक प्रकारचें भव्यगंभीर वातावरण सर्व नाटकगृहात निर्माण झाले, आणि जिची इतका वेळ ते चिकार गर्दीने भरून गेलेलें नाटकगृह एक व्यक्ति असल्याप्रमाणे, अनिमिष नेत्रानी वाट पाहात होते, ती श्रीमती रोहिणीदेवी–नृत्यकलेची सजीवनी श्रीमती रोहिणीदेवी–नृत्यकलेची अनभिषिक्त सम्राज्ञी श्रीमती रोहिणीदेवी–एखाद्या राजहंसीप्रमाणे, हृदयाला हेलकावे देणाऱ्या ऑर्केस्ट्राच्या संगीताच्या ठेक्यावर, आपले एक एक कोमल पाऊल टाकीत अवतीर्ण झाली अहाहा ! त्या वेळचा त्या रसिक प्रेक्षकवृंदाचा उत्साह काय वर्णावा ! श्रीमती रोहिणीदेवीच्या प्रत्येक पदक्षेपाबरोबर जणू काय साक्षात नृत्यदेवताच अवतीर्ण होत होती ! रंगभूमीवरील सहस्त्ररश्मि दीपाच्या झगझगीत उजेडात आपल्या पुराणकालीन पोषाखात तिने आगमन करताच जणू काय स्वर्गातून प्रत्यक्ष ऊर्वशीच अवतरल्याचा सर्वांना भास झाला. टाळयाचा एकच कडकडाट झाला. त्यांत ऑर्केस्ट्राचे स्वर ऐकू येईनातसे झाले, आणि नाटयगृहाचे छप्पर उडून जाते की काय, अशी त्याच्या मालकाला भीति पडली ! सुप्रसिद्ध कुलीन नर्तिका श्रीमती रोहिणीदेवी हिचें अपूर्व थाटाने स्वागत झाले.

आणि हें सर्व आपल्या चर्मचक्षूनी पाहून घेतल्यावर, मीं एक समाधानाचा लाबचलांब सुस्कारा सोडला व अविश्रात श्रमाने आलेला थकवा घालविण्याकरता अतिशय जरूर असलेल्या चहा व सिगरेटची आराधना करण्यासाठी नेपथ्यरचनेच्या खोलीकडे पाऊल वळविलें. चहा घेत असतांना अस्पष्ट ऐकू येणाऱ्या, प्रेक्षकवर्गाच्या रसिकतादर्शक टाळयाच्या कडकडाटाने माझें हृदय उत्फुल्लित आणि शरीर पुलकित होत होते.

कारण, प्रिय वाचकहो ! त्या 'श्री कथाकली नृत्यकला मंडळी' चा संस्थापक, व्यवस्थापक व धनको मीच होतों, असें मोटया अभिमानानें पण नम्रतेने आपल्या कर्णरंध्रांवर घालण्याची मी परवानगी घेतों.

त्या रात्रीं एक वाजतां तो युगप्रवर्तक खेळ आटोपल्यावर श्रीमती रोहिणीदेवी व रामय्या ह्यांच्या सुखकारक सहवासाचा आनंद चाखीत टॅक्सीतून घरी परत येताना माझ्या खिशात ३९४७ रु. १० आ. आणि ९ पै. एवढी रक्कम खर्च वजा जाता त्या खेळाचें उत्पन्न म्हणून होती. वर वाच्यार्थानें उल्लेखिलेली सुवर्णाची रात्र अक्षरशः सुवर्णाचीच झाली होती.

मी आमच्या मंडळीच्या फ्लॅटमधल्या माझ्या खोलीत येऊन बिछान्यावर पडलो खरा, परंतु आजचा एकदर कार्यक्रम इतका अपेक्षेबाहेर यशस्वी आणि फलदायी झाला होता की, मला तशा परिस्थितीत झोप येणे शक्यच नव्हते. चारच महिन्यापूर्वी मला आजच्या रात्रीचे भविष्य खुद्द 'चिरो' ने सांगितलें असते तरी मी त्यावर विश्वास ठेवला नसता. परंतु तशा अद्भुत गोष्टी घडून आल्या होत्या खऱ्या, व मी जे जे बेत आखीत गेलो होतो, ते सर्व पूर्णपण यशस्वी होत गेले होते हेहि तितकेच खरे.

त्या गोष्टीला साधारण साडेतीन महिने झाले असतील त्या वेळी मी बोमनजीच्या चाळीत एक खोली घेऊन राहात होतो. काहीच उद्योगधंदा नसल्यामुळे आणि पैशाचीहि ददात नसल्यामुळे, रात्रीचे नाटकसिनेमांना जायचें आणि दुपारी तणावून द्यायची हा माझा कार्यक्रम त्याप्रमाणे मी त्या दिवशी दुपारी —मला वाटते तो रविवार होता— निद्रादेवीच्या वरदहस्ताखाली निरामयपणे घोरत पडलों असता आकस्मिकपणे माझ्या निद्रेचा भग झाला. चाळीसमोरील पटागणाच्या दिशेच्या खिडकीतून आत शिरून, एका जोराने बडविल्या जाणाऱ्या ढोलक्याचा आवाज माझ्या कानातील पडद्यावर अत्याचार करीत होता. त्या तशा गोगाटात झोप लागणे शक्य नसल्यामुळे, त्या ढोलके बडविणाऱ्याला पूज्य असणाऱ्या व्यक्तीचा उद्धार करण्यासाठी राष्ट्रभाषेला आवाहन करीत मी उठलो आणि खिडकीमध्ये जाऊन उभा राहिलो

खाली नाच चालला होता. थोडा वेळ तो नाच पाहत खिडकीशी उभें राहिल्यावर माझा राग हळू हळू कमी होऊं लागला व माझ्या नकळत मीहि तो नाच पहाण्यात रमून गेलो. एक सतराअठरा वर्षांची काळीसावळी मुलगी रामय्याने ढोलक्यावर वाजविलेल्या केरवा तालावर नाचत होती. तिच्या

अंगावर फाटकीतुटकीं वस्त्रें होतीं आणि त्यांतील छिद्रांतून नुकतेंच तारुण्याचा बहर चढू लागलेले तिचें मुसमुशीत शरीर डोकावीत होतें. प्रियवाचक, तिच्या त्या घटाप्रमाणे किंवा दुसऱ्या कशाप्रमाणे दिसणाऱ्या स्तनांचें, टचटचीत कुचाग्रांचें, लुसलुशीत जघनांचे किवा पुष्ट नितंबांचें सुललित आणि गुळगुळीत भाषेंत वर्णन करण्यास माझी लेखणी असमर्थ आहे. परतु, बोमनजीच्या चाळीतील सज्जांतून व खिडक्यातून गर्दी करून उभ्या राहिलेल्या आणि उच्च समाजांत मोडल्या जाणाऱ्या आबालवृद्धाच्या नजरा तिकडे एकाग्रतेनें लागून राहिलेल्या होत्या ह्यावरूनच काय ती तिच्या तारुण्ययुक्त शरीराची आणि सौदर्याची कल्पना करा, एवढे सागितले म्हणजे पुरे. तिचे नृत्य आकर्षक होते खास. तिच्या पदन्यासाबरोवर होणारा तिच्या पायातील घुगराचा तालबद्ध नादहि, डोळ्यांना तिची मोहक आकृति जितकी सुखावह वाटत होती, तितकाच कानाना मधुर वाटत होता. सर्व लोक तटस्थपणाने तिच्या त्या नृत्याकडे व जीर्ण वस्त्रातून उतू पाहणाऱ्या मुसमुसलेल्या तारुण्याकडे देहभान विसरून पहात होते. अखेर तिचा नाच थाबला व एक फडके घेऊन रामय्या भीक मागत खिडक्याखालून फिरूं लागला. तेव्हा कोठे सर्वजण भानावर आले आणि अशा तऱ्हेचे नाच करून पोट जाळणाऱ्या लोकाच्या अधःपातावर टीका करीत सर्वांनी भराभर खिडक्या बंद करून घरात पोबारा केला.

माझ्या खिडकीशी रामय्या येतांच, मी त्याला वर येण्याविषयी खूण केली. थोड्याच वेळात लोकाच्या फुकटात खेळ पाहण्याच्या वृत्तीविषयीं आपणाशीच काहीतरी पुटपुटत तो व सीतम्मा –ती मुलगी – माझ्या खोलीत आली. त्या दोघाना बसावयास सागितल्यावर मी विचारले,

" तुझ नाव काय ? "

" रामय्या ! "

" हे नाच कुणी शिकवले ह्या मुलीला ? "

" मीच शिकवले ते तिला. हा आमचा पिढीजाद धंदा आहे. आमच्या देशांत ह्या नाचाना फार मान आहे ! " रामय्या म्हणाला.

" तुझा देश कोणता ? "

" मलबार. "

" पण तू मराठी छान बोलतोस की ! " मीं जरा आश्चर्याने विचारलें.

" हो, आजोबापासून आम्हीं इकडेच राहतों. माझा सर्व जन्म इकडेच गेला."

" ही मुलगी तुमची कोण ? "

" ती माझी मुलगी. "

नंतर मी जरासा विचार करून त्याला म्हटलें, " हें बघ, जर महिना शंभर रुपये पगार दिला तर मी सांगतों तसं करायला तुमची तयारी आहे ? "

" महिना शंभर रुपये ! " आश्चर्यानें त्यानें 'आ'च वासला.

" होय, महिना शंभर रुपये. " मी परत शांतपणानें म्हणालों.

" आणि काम काय करायचं आम्ही ? " त्यानें उत्सुकतेनें प्रश्न केला.

" काम विशेष काही नाही. ही मुलगी सध्या नाच करते तेच माझ्या कंपनीत करायचे. तुलाहि मधूनमधून नाचावं लागेल. येतं का तुला नाचायला ? "

" हो तर .... मीच तर हिला नाचायला शिकवलं ना ? "

" छान तर ! हं. ह्या नाचणाऱ्या मुलीचं नांव काय ? " कोपऱ्यांत अंग दुमडून बसलेल्या त्या नवयौवन बालेकडे पाहात मी प्रश्न केला.

" सीतम्मा ! " रामय्या म्हणाला.

" सीतम्मा ! नांव काही तितकंसं चांगलं नाही. " मी विचार करीत म्हणालों, " तिचं नांव बदललं पाहिजे. "

" म्हणजे ! " रामय्या आश्चर्यचकित होऊन म्हणाला. माझ्या प्रत्येक कल्पनेबरोबर त्याला आश्चर्याचे एकावर एक धक्के बसत होते.

" मुलीची नावं आम्हीं लग्न झाल्यावरच बदलतों. " तो गोंधळून म्हणाला.

" होय. तिचंहि लग्नच करायचं ! " मी हंसत हंसत म्हणालों.

कोपऱ्यांत बसलेल्या सीतम्माच्या गालांवर गुलाब की कमळे फुलली. रामय्याला माझ्या बोलण्याचा कांहीच बोध न होऊन तो माझ्या तोंडाकडे पहातच राहिला.

" म्हणजे माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की, तिचं कलेशी लग्न लावायचं ! " मी म्हटले.

" कलेशी लग्न ! " रामय्याला माझ्या बोलण्याचा कांहीच अर्थबोध होईना.

" होय ! आणि तें लग्न करण्यासाठी तिला आधी कुलीन झालं पाहिजे. "

" कुलीन ! " रामय्या उद्गारला.

" होय, कुलीन ! ' कुलीन ' म्हणतांच असा दचकू नकोस," मीं म्हणालों. त्याच्या गोंधळून गेलेल्या मन:स्थितीची मला फारच गंमत वाटत होती.

" कुलीन म्हणजे ? " त्याने प्रश्न केला.

" कुलीन म्हणजे उच्च कुलांतली. " मी स्पष्टीकरण केलें.

" काय राव थट्टा करतां ? आम्ही डोंबारी ! आम्ही कसे उच्च कुलांतले होऊ ! कांही नको ते. तुमचं ते कलेशीं लग्न नको आणि कुलीनपणाहि नको! गरिबाची थट्टा करता ! " असे म्हणत तो जराशा रागानेच जावयास उठला.

" हे बघ ! " मीं त्याला थांबवून म्हटले, " माझं म्हणण तर ऐकून घे. कुलीन होणं तुला वाटतं तितकं अवघड नाही. कुलीन व्हायचं म्हणजे आपण कुलीन आहोत अशी जाहिरात करायची. जो भेटेल त्याला तस सागत सुटायचं. कारण हल्लीच्या दिवसात कुलीनाखेरीज दुसऱ्या कोणाच ऐकून घ्यायला लोक तयार नाहीत. कला आणि कुलीन ह्याचा कलात्मक सयोग झाल्याशिवाय लोकाना मजा वाटत नाही. ' कलेसाठी कला ' करीत, कला आणि जीवन हा वाद मिटवायचा असतो. हा कलाजीवनाचा जीवन वाद फार मोठा आहे " मी बोलत होतो खरा परंतु माझं बोलणं रामय्याला मल्याळम्प्रमाणे भासले असेल! मी काय उगाच त्याची थट्टा चालवली आहे अशा मुद्रने तो उभा होता. म्हणून मी जरा सोप्या भाषेत बोलू लागलो " हें बघ, अलिकडच्या लोकाची अशी वृत्ती आहे की, त्यान‌ सर्व काही केलेल चालतं. पण ते ' कला ' आणि ' कुलीनपणा ' यांच्या नावाखालीच केलं पाहिजे. एखाद्या धंदेवाल्या गाणारणीन तमाशांत लावणी म्हटली तर ' अश्लील ', ' हीन अभिरुचीचे ' म्हणून समाजांतील शिष्ट टीकाकार त्याकडे नाकं मुरडतील; पण तीच लावणी जर एखाद्या स्त्रीनं आपल्या कुलीनपणाचा डंका वाजवीत, भावगीत ह्या साजुक नावाखाली म्हटली, तर तेच छब्बू टीकाकार मिटक्या मारीत ती ऐकतील आणि वर टाळ्याहि देतील. तसंच ह्या नृत्यकलेबद्दल. त्याला नाच म्हटलं की त्यांच्या अंगावर शहारे येतील आणि त्याला कोणी दमडीहि फेकणार नाही. ह्याचा अनुभव तुला आता आलाच आहे. शिवाय सीतम्मा ' कुलीन ' झाली तरी तुला त्यांत विशेषसं भिण्यासारखं कांही नाही. तिच्यांत तसा म्हणण्यासारखा फरकहि पडणार नाही. आता तिचे कपडे फाटके आहेत आणि त्यांतीक

छिद्रांतून तिचे मादक अवयव दिसताहेत, ते तसेच दिसूं द्यायचे. खूप लांब अठरा हातीं लुगडी नेसायचीं, पण ती अशा खुबीनं की त्यातून तिचे अवयव दिसताहेत त्यापेक्षाहि अधिक उठावदार आणि मनोवेधक रीतीनं दिसले पाहिजेत. ही एक खुबी आहे. आणि ही खुबी हस्तगत करण्यासाठी तिला कुलीन बनलं पाहिजे. शिवाय पुरुषांकडे संशयाच्या दृष्टीनं पाहणं, जवळ नेहमी एक आरसा आणि पावडर बाळगणं, वगैरे बारीक सारीक गोष्टीहि बऱ्याच आहेत त्या नतर तुम्हांला सावकाश सागेन. बाबा, हा समाज आहे. त्याला झुलवलं पाहिजे. त्याच्याकडे सरळ भीक मागितली तर तो काही देणार नाही; पण त्याला युक्त्याप्रयुक्त्यांनी फसवलं, तर तो हसत हसत पैसे फेकील ! "

कुलीनपणा, कला, समाज वगैरे विषयांचे सागोपांग आविष्करण करणारें हें भाषण करून, दम खाण्यासाठी मी जरा थाबलो त्याचा फायदा घेऊन रामय्या एकदम म्हणाला, " राव, ते काही आपल्याला जमेलसं दिसत नाही. तुमचा तो समाज कोण, ती कला काय, आणि तो कुलीनपणा काय, ते आम्हाला समजायचं नाही. जातो आम्ही. चल ग सीतम्मा." असे म्हणून तो त्या पोरीसह बरोबरीच जावयास उठला.

" हे बघ; शभर रुपये महिना ! तुम्ही आतां रस्त्यावर उन्हातान्हातून नाच करतां. तेच मी सागेन तिथ आणि सांगेन तसे करायचे. ते कलाबिला मी पाहून घेईन. शंभर रुपये महिना ! " मी मुद्दाम 'शंभरा'वर जोर देऊन तो शब्द दोनदा उच्चारला.

आणि तो उपाय मात्र लागू पडला. माझ्या व्याख्यानाच्या गडबडीत पगाराची गोष्ट तो अजिबात विसरून गेला होता. अखेरीस कुलीन होण्यापेक्षा किंवा कलेची उपासना करण्याच्या उच्च कल्पनेपेक्षा, शभर रुपये महिना पगा-राची कल्पना त्याला अधिक पसंत पडली आणि तो माझ्या म्हणण्याप्रमाणे वागण्यास कबूल झाला.

लवकरच वर उल्लेखिलेली आमची " श्री कथाकली नृत्यकला मंडळी " अस्तित्वांत आली. सीतम्माला श्रीमती रोहिणीदेवी हा किताब देण्यांत येऊन तिच्यावर कुलीनपणाचें शिक्कामोर्तबहि करण्यांत आलें. तिला आधुनिक पद्ध-तीचे दोनचार नाच रामय्याकडून शिकविण्यांत आले व त्या दोघांचेहि कांही नवीन नाच बसविण्यांत आले. आणि ह्या सर्वांच्या तालमी चालू असतांना मीं

आमच्या मंडळीचा आणि कुलीन आणि कलाप्रिय नर्तकी 'श्रीमती रोहिणी-देवी' चा एकच गाजावाजा करून सोडला.

तो पहिला प्रयोग फारच बहारीचा वठला, हें आधी सांगितलेंच आहे• त्या पहिल्या रात्रीविषयीचे काही अभिप्राय पुढे देतों.

एका प्रसिद्ध देशसेविकेकडून मी पुढील सदेश अल्पोपहाराच्या वेळीं लाबविला व दुसऱ्या दिवशी सर्व वर्तमानपत्रातून तो फडकला.

"काल रात्री मी 'श्री कथाकली नृत्यकला मंडळी' च्या नृत्याच्या कार्यक्रमाला जाऊन आले आणि माझे हृदय आनदाने हेलावून गेले. नृत्य ही एक उच्च दर्जाची उदात्त कला आहे. आपल्या प्रिय भारतमातेची ती आपणाला एक अमूल्य देणगी आहे श्रीमती रोहिणीदेवी ह्या कुलीन आणि कलावत नर्तकीचा नाच तर अद्वितीय असाच आहे त्याच्या त्या नृत्यात आमच्या परमप्रिय भारतवर्षाच्या सस्कृतीचे, चालीरीतीचे आणि आशाआकाक्षाचें स्वच्छ प्रतिबिब पाहावयास सापडते आपल्या पददलित देशाच्या उन्नतीच्या दृष्टीने व आतरराष्ट्रीय सलोखा निर्माण करून जागतिक शातता प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने , ह्या नृत्याचे महत्त्व फार आहे असे मी समजते. माझ्या प्रिय देशबाधवानी ह्या नृत्याचे – आपल्या भारताच्या जतन करून ठेवलेल्या अमूल्य ठेव्याचे–एकवार अवश्य दर्शन घ्यावे विशेषत· विधिमडळात जाऊन दिवाणगिऱ्या स्वीकारू पाहाणाऱ्या माझ्या देशभक्त मित्रानी तर तो एकवार जरूर पाहून त्याचा मन पूर्वक अभ्यास करावा अशी मी त्याना शिफारस करते."

काही उत्साही व तरुण सपादक असलेल्या वर्तमानपत्रानी "श्रीमती रोहिणीदेवी-खास अक" काढले व ते तिच्या चरित्रानी, तिच्याविषयीच्या खऱ्या-खोटया बारिकसारिक गोष्टीनी, मुलाखतीनी व फोटोनी भरून काढले. तिच्या 'उद्बोधक आणि स्फूर्तिदायक' चरित्राचा साराश असा :—

"श्रीमती रोहिणीदेवी ह्या कुलीन नर्तिकेचा जन्म टल्लीकुट्टी पद्नाभ वेंकटम् ह्या गावी एका नंबुद्री ब्राह्मणाच्या उच्च घराण्यात झाला. लहानपणा-पासूनच त्याचा नृत्यकलेकडे ओढा फार. चालावयास शिकतांना त्या ताला-सुरावर पावले टाकीत. यात्राच्या वेळी देवळातून नाच होत, त्या वेळीं त्या तहानभूक विसरून तासचे तास त्या नाचाचें मार्मिक निरीक्षण करीत बसत

त्यावेळीं नृत्यकलेच्या उदात्ततेचा त्यांच्या भावनाप्रवण मनावर विलक्षण पगडा बसला आणि त्याबरोबरच हीन वृत्तीच्या लोकांच्या हातांत ही कला सापडावी, हें पाहून त्याचें हृदय तिळतिळ तुटू लागले. त्यांनी स्वत.ला नृत्यकलेला वाहून घेण्याचें ठरविले व तसे प्रयत्न सुरू केले. परंतु बुरसलेल्या आणि जुनाट कल्पना उराशी बाळगून बसणाऱ्या त्याच्या सनातनी आणि कर्मठ आईबापाना अर्थातच तें पसंत नव्हते. तरीपण श्रीमती रोहिणीदेवीची इच्छा दुर्दम्य होती. कलेच्या सेवेला आणि उन्नतीला त्यानी आपणाला वाहून घेतलेले होते. नाना तऱ्हेच्या हालअपेष्टा आणि अपमान सहन करून अखेरीस त्यानी आपले ध्येयाचे शिखर गाठलेच."

ह्या तिच्या चरित्रानी व मुलाखतीनी इतकी खळबळ उडवून दिली की सांगतां सोय नाही ! रोज खेळाच्या वेळी बेसुमार गर्दी होई. कोणीहि चारजण ऑफिसांत, कॉलेजांत, चौपाटीवर, ट्राममध्ये-कोठेहि भेटले, तरी बोलायचा एकच विषय आणि तो म्हणजे श्री रोहिणीदेवीचे लावण्य, कुलीनपणा आणि नृत्यकलेतील तिचे नैपुण्य हळूहळू तिला 'फॅन मेल' येऊ लागली अर्थातच सीतम्माला-छे, श्रीमती रोहिणीदेवीना-पत्रे लिहिण्याचे ज्ञान व फुरसतहि नसल्यामुळे, त्यासाठी एखाद्या खाजगी कारभाऱ्याची जरूर भासू लागली तसें वर्तमानपत्रातून जाहीर करताच, विनामोबदला काम करण्यास तयार असलेल्या श्रीमंत आणि उच्चकुलोत्पन्न स्वयंसेवक तरुणाची, अणि वाटेल त्या मोबदल्यावर काम करावयाची तयारी असलेल्या मद्राशी पदवीधराची, आमच्या फ्लॅटसमोर मुलाखतीच्या वेळी एकच गर्दी झाली. त्यामुळे रस्त्यावरची रहदारी थोडा वेळ बद पडली व अखेरीस पोलीसाची मदत घेऊन ती गर्दी मोडणें भाग पडले. शेवटी एका निरुपद्रवी दिसणाऱ्या लुंगीवाल्या मद्राशी एम् ए ची त्या जागेवर महिना पस्तीस रुपयांवर नेमणुक करण्यात आली. ह्या तिच्या अपूर्व यशामुळे वर्तमानपत्रातून " कुलीन स्त्रिया आणि नृत्यकला " ह्या विषयावरील वादविवादाला पुन्हा एकदा जोराची चालना मिळाली. पूर्वपक्ष उत्तरपक्ष, खडन मंडन, शिवीगाळी मुडण अशी वादाची खूपच धुमश्चक्री उडाली. याचा परिणाम असा झाला की, अनेक सुखवस्तु आणि सुशिक्षित स्त्रियांची आमच्या कंपनींत येऊन नृत्यकलेची सेवा करण्याची परवानगी मिळण्याबाबत बरीच पत्रे माझ्या टेबलावर येऊन पडू लागलीं आणि मला त्यांतून कोणाची निवड करावी

ह्याबद्दल मोठाच पेच पडला. कारण सुशिक्षित आणि त्यांतून श्रीमंत—मग त्यांतून सुंदर स्त्रिया कितीशा निघणार! अखेरीस एका बॅरिस्टरच्या सुशिक्षित बायकोला आमच्या कंपनींत येऊन कलेची जोपासना करण्याची परवागी देण्यांत आली. पुढेमागे श्री. रोहिणीदेवी डोईजड झाल्यास त्यावर उत्तर म्हणून दूर-दृष्टीनेच मी हा डाव योजून ठेवला होता.

जिकडे पाहावें तिकडे आमची स्तुतिच स्तुति कानांवर पडे. वर्तमानपत्रें तर सारी एकजात आमच्यावर स्तुतिसुमने उधळीत होतीं. ह्या गडबडींत लावण्य-वती रोहिणीदेवीवर कविता करून चारदोन कवींनीहि वाहत्या गंगेत हात धुवून घेतले. गुजराती पत्रें त्यांना आमच्या नृत्याचा कार्यक्रम आवडत होता म्हणून, मराठी पत्रे मी ‘ महाराष्ट्राचा झिगफिल्ड ’ त्या कंपनीचा मालक म्हणून, इंग्रजी पत्रे त्याना भारतीय नृत्यकलेंतले कांहीच कळत नव्हतें म्हणून,— एकूण सर्वच आमच्यावर बेहद्द खूष होते. काही कांही जणाना आमचा नृत्याचा कार्यक्रम आवडत नसे. पण ‘भारतीय नृत्यकला’ ‘उच्च अभिरुचि’, ‘रसिकता, ’ वगैरे मोठमोठया शद्बांना गांगरून जाउन, तसें बोलून दाखविण्याचें धैर्य त्यांना क्वचितच होई. उलट इतरांबरोबर तेहि टाळया पिटीत. ह्या सर्व स्तुतीत ‘ग्रामगंगा ’ या सनातनी पत्राच्या टीकचा तेवढा बदसूर कानांवर पडत होता. त्याने आमच्या नृत्याला ‘ नाच ’ म्हणून ‘ अश्लील, अश्लील. ’ ‘ सभ्य माणसांनी पाहण्यास अयोग्य असी एकच ओरड केली. श्री रोहिणीदेवीच्या न-याच्या वेळच्या पुराणकालीन पोषाखावर तर त्यांचा फारच डोळा (वाच्यार्थाने) होता. “हा पोषाख पाहून लाजेने माना खाली घालाव्या लागतात. पोषाखाचा हेतु अंग झाकण्याचा आहे, पण हा पोषाख असा विचित्र आहे की, तो घातल्याने दिसू नये तें सर्व अंग दिसतें. हा पोषाख पुराणकालीन आहे हें आम्हांला मान्य आहे.परंतु ह्या नवमतवाद्याना पुराणकालीन नीतिमत्ता नको, त्यांना फक्त त्या वेळचा पोषाख पाहिजे. काय ही अधोगति ! ” वगैरे वगैरे बरीच टीका असे. परंतु त्यामुळे झालें काय, तर चष्म्यांच्या दुकानांतून म्हाताऱ्या पेन्शनरांची आपले चष्मे सुधारून घेण्यासाठी खूप गर्दी होऊं लागली, आणि ही टीका आली त्याच्या दुसऱ्याच खेळाला पुढच्या सर्व रांगा म्हाताऱ्यांनी अडवून टाकल्या. टीकाविषय झालेल्या पोषाखाचें बारकाईने निरीक्षण करून अखेरीस “ हा पोषाख सभ्य स्त्रियांना खरोखरीच

माना खाली घालावयास लावील असा आहे" अशा अर्थाची पत्रमाला ग्रामगंगेंतून सुरू झाली. त्याचा परिणाम असा झाला की, खास झनाना शोप्रमाणेच खास वृध्दांचे शो, बेसुमार गर्दीमुळे तिकीटांचा दर दुप्पट करून, ठेवणे मला भाग पडले. तसेच ही टीका आणि तो पत्रव्यवहार असाच चालू राहील अशी अट घालून आमच्या ह्या जुन्या पिढीतील गिऱ्हाइकांच्या सोयीसाठी खास मोठ्या टाइपात एक जाहिरातहि ग्रामगंगेत मला द्यावी लागली.

ही झाली सर्वसाधारण प्रेक्षकाची गोष्ट. परंतु जे खरे रसिक होते आणि भारतीय नृत्यकलेतील तज्ज्ञ म्हणून ज्याची ख्याति होती, तेसुद्धा आमच्या नृत्याच्या कार्यक्रमावर बेहद्द खूष होते. इतके कलापूर्ण आणि भावनाविष्करण करणारे नृत्य आपण बऱ्याच वर्षांत पाहिले नसल्याबद्दलची त्या सर्वांत एकवाक्यता होती. इतके हे आमचे नृत्य होते तरी काय, हे जाणण्याची बऱ्याच चौकस वाचकाना साहजिकच उत्सुकता लागून राहिलेली असणार. म्हणून नमुन्यादाखल तज्ज्ञानी 'स्वर्गीय' म्हणून वर्णिलेल्या 'सत्यवान-सावित्री' ह्या आमच्या लोकप्रिय नृत्याचे यथामति वर्णन देतो --

रामय्या सत्यवान होई व हातांत एक सोनेरी बेगड लावलेली लहानशी कुऱ्हाड घेऊन जंगलाच्या पडद्याच्या पार्श्वभूमीवर समोरच टाकलेल्या एका लाकडाच्या ओडक्यावर घाव मारीत आहे असा आविर्भाव करी. मधूनच पाय फेंगडे करून तो आपल्या कपाळावरील घाम बोटानी पुसून काढी त्या वेळी तर तज्ज्ञांकडून मोठी कलापूर्ण 'पोज' म्हणून टाळ्या पडत. इतक्यात सावित्री ( श्री. रोहिणीदेवी ) नाचत नाचत प्रवेश करी. नतर थोडा वेळ दोघाचे चित्र-विचित्र हावभाव करीत 'द्वंद्वनृत्य' होई. त्यावेळी तर रामय्या एखाद्या तृतीय-लिंगी माणसाप्रमाणे हावभाव करून तोडे वेडीवाकडी करण्याची कमाल करी. कलाभिज्ञाकडून तेव्हा नुसता टाळ्याचा कडकडाट होई. नंतर तो आपला आंगठा तोंडाजवळ नेऊन तहान लागल्याचें दाखवी व सावित्री नाचत नाचत परत विंगमध्ये जाई. परंतु त्या वेळी ती परत केव्हा येते इकडेच सर्व प्रेक्षकांचे लक्ष लागून राहिलेले असें. कारण तिचा पोषाख फारच उंची आणि कलापूर्ण होता. तो पोषाख पौराणिक कालाला धरून व्हावा, म्हणून आम्ही आमच्या खास शिप्याला अजंठ्याची लेणी, पुरीचें देऊळ वगैरे जुने शिल्पकलेचे नमुने पाहून त्यावेळच्या पोषाखाचा अभ्यास करावयास पाठवून दिले होतें. तो परत

आल्यावर ह्या नृत्याच्या पोषाखासाठी खास पॅरीसहून हिरव्या रंगाचें दोन वार झिरझिरीत रेशमी कापड मागविण्यांत आलें होतें. (हें कोणास खोटें वाटत असल्यास सावित्रीची चोळी व कंबरेला गुडाळावयाचें वस्त्र तयार करून उरलेला दीड वार कपडा अजून आमच्याकडे आहे तो पाहून जावा, म्हणजे माझ्या सत्यकथनाची खात्री होईल. ) हा पोषाख फारच आकर्षक आणि कलापूर्ण असल्याबद्दलची ग्वाही सर्वांनी दिली होती. कित्येक तरुण तर केवळ हा पोषाख पाहण्यासाठी दुर्बिणी घेऊन येत. असो. सावित्री आंत पाणी आणण्यासाठी गेल्यावर यमराज रेड्यावरून आगमन करी. आमचा आचारी हें काम ( यमाचें ) करी. रेड्याचें तोंड प्रेक्षकाच्या विरुद्ध दिशेला करून त्याला उभें करण्यात येई ह्याचें कारण इतकेंच की, त्याच्या शेपटीच्या ज्या नैसर्गिक हालचाली होत, त्या आमच्या ऑर्केस्ट्र्याच्या तालावर होत, आणि त्यामुळे एकंदर वातावरणाला विलक्षण उठाव मिळे. पहिल्याने आम्ही त्या रेड्याला तालावर मान हलविण्याचें पुष्कळ शिकवून पाहिलें. परंतु तो अगदी मठ्ठ निघाला . त्या बॅरिस्टरच्या सुशिक्षित बायकोनेदेखील एवढ्या वेळांत बरीच प्रगति केली होती. इतका तो बिनडोक्याचा निघाला. असो. नंतर हातांत एक दोरीचा फास घेऊन डरकाळ्या फोडीत व ‘ तांडवनृत्य ’ करीत यमराज सत्यवानाच्या जवळ जाई व विकट हास्य करी. नंतर थोड्या आडव्या तिडव्या उड्या मारून आपल्या हातातील फास सत्यवानाच्या गळ्यांत तो अडकवी. त्याबरोबर सत्यवान ताल(सुरावर मरून पडे. इतक्यात डोक्यावर एक मडकें घेऊन नाचत नाचत ( घटनृत्य ) सावित्री पुन्हा प्रवेश करी. ती मोठ्या आनंदात येई; परंतु घडलेला प्रकार पहाताच तिचें दु:ख अनावर होई. तें मडके डोक्यावरून खाली पडून फुटून जाई. त्या वेळचें तिचें दु:खभावनेचें आविष्करण करणारें नृत्य अमर राहील, असें तज्ज्ञ म्हणतात. मी बापडा काय वर्णन करूं त्याचें ! त्यावेळी प्रेक्षकांतून सारखे हुंदके ऐकू येत. नंतर ती नाना तऱ्हांनी यमाची मनधरणी करी आणि थोड्याच वेळांत सत्यवान परत जिवंत होई. त्या वेळचा तिचा आनंद काय वर्णावा ! मग यमराज रेड्यावरून व सत्यवान-सावित्री नाचत नाचत ( द्वंद्वनृत्य ) निघून जात.

अशा रीतीने आमचा कार्यक्रम धूमधडाक्याने चालला होता. परंतु तो तसा किती दिवस चालणार ? जोपर्यंत त्यांत नाविन्य होतें, तोपर्यंत खूप गर्दी झाली आणि मीं पैसाहि खूप केला. ह्या अवधींत रामय्या सीतम्माचा पगार

५०० रुपयांवर गेला होता. परंतु नंतर जसजसे आमचे कार्यक्रम शिळे होऊं लागले, तसतसे उत्पन्नहि घटू लागले. ह्यावर काय उपाययोजना करावी, याबद्दल मी विचार करीत होतों. पुन्हा एकदा कांही तरी खळबळ उडवून दिल्याशिवाय मंडळीला जोर येणार नाही हें मी जाणून होतों आणि त्याविषयीची एक कल्पनाहि माझ्या डोक्यांत घोळत होती.

त्या दिवशी संध्याकाळी पांचाच्या सुमारास मी ऑफिसमध्ये ह्यावर काहीतरी तोड काढावी म्हणून बसलो होतो इतक्यांत नेहमी-प्रमाणे नखशिखात उची पण बेढब पोषाख करून सीतम्मा प्रवेश करती झाली. कुलीन स्त्रियाप्रमाणे ती अलिकडे पोषाख करी नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे माझ्यासमवेत कोठेतरी फिरावयास किंवा सिनेमाला जाण्याचा तिचा बेत असावा असे तिच्या येतानाच्या उत्साहावरून म्हणावयास काहीच हरकत नाही. परतु तिने खोलीत दोनचार पावले टाकली मात्र, एका व्यक्तीकडे नजर जाताच तिच्या नाकाचा शेंडा एकदम वर गेला आणि गाल पोह्यानी भरून गेले.

कारण, माझ्या समोरच्या कोचावर अस्सल कुलीन आणि कलोपासक नर्तकी श्रीमती चित्रादेवी – ती बॅरिस्टरची बायको – तिचेच हे रगभूमीवरील टोपणनाव – बऱ्याच मोकळेपणाने अधिष्ठित झाल्या होत्या. सीतम्माकडे लक्ष जाताच तिच्याहि कपाळावर आठ्याचे जाळे पसरले.

दोघीना थोडा वेळ एकमेकीकडे मारक्या म्हशीप्रमाणे पाहून घेतलें.

मला तो देखावा एकूण चागला वाटला नाही.

मी सीतम्माला एका खुर्चीवर बसायला सागितले.

बराच वेळ कोणीच कांही बोलले नाही.

" आज बाहेर पडायचा विचार आहे का ? " अखेर सीतम्माने शांततेचा भंग करून प्रश्न केला.

" आज काम आहे बुवा बरंच ! " मी तिच्याकडे पाहून बळेंच तोंडावर हंसू आणून म्हणालों.

" अस्सं ! " चित्रादेवीकडे एक अर्थपूर्ण कटाक्ष टाकून सीतम्मा म्हणाली.

" सध्या मंडळी कांही पूर्वीइतक्या जोरानं चालत नाही, त्यावर काय तोड काढावी ह्याचा आम्ही विचार करीत आहों. " मी म्हणालों.

" आलं लक्षांत ! " कुर्यांत सीतम्मा म्हणाली.

तिला मीं दिलेल्या नकारामुळे चित्रादेवी थोडीशी खुलली होती.

" होय बाई ! मोठाच बिकट प्रश्न आहे ! " विचारग्रस्त चेहरा करून चित्रादेवी मला म्हणाली.

" मला वाटतं आता एखादं नवीन नृत्य शोधून काढावं." सिगरेट शिलगावीत मी म्हणालों, " आणि तेहि असं आकर्षक आणि नाविण्यपूर्ण असाव की यव् ! परतु खर्चहि फारसा नको. "

आम्ही दोघे त्या प्रश्नावर विचार करूं लागलों. सीतम्मा फुरंगटून बसली होती व मधून मधून माझ्याकडे रागाचे आणि चित्रादेवीकडे मत्सराचे दृष्टिक्षेप करीत होती.

"हं! मला एक छानशी कल्पना सुचली आहे!" जवळ जवळ कोचावरून उडी मारूनच चित्रादेवी म्हणाली, " एका नव्या नृत्याची कल्पना आहे ती. आणि तुम्ही म्हणतां तसा कपडयालत्त्याचा खर्चहि नाही त्याला. "

तिची कल्पना अगदीच टाकाऊ नसणार ह्याची मला खात्री होती. आतापर्यंत तिची हुशारी आणि कल्पकता माझ्या चांगलीच लक्षात आली होती. आपली सुदर कल्पना सागण्यासाठी ती अगदी अधीर झाली होती. आणि मलाहि ती जाणण्याबद्दल बरीच उत्सुकता लागून राहिली होती, हेंहि नाकारण्यात अर्थ नाही.

" आपण अदाम आणि ईव्ह ज्ञानाचं फळ खातात ह्या प्रसंगावर नृत्य रचू. " ती आपल्या कल्पनेवर खूष होऊन म्हणाली, " विषय नवीन आहे, शिवाय कपडयाचा मुळीच खर्च नाही. कशी आहे कल्पना ? "

" कल्पना आकर्षक आहे! "तिची नाविन्यपूर्ण कल्पना ऐकतांच मला जो आश्चर्याचा धक्का बसला होता, त्यांतच मी हे शद्ब कसेबसे बोललों.

" अदाम आणि ईव्ह कोण ? " आपणहि विचारविनिमयांत थोडासा भाग घ्यावा आणि चित्रादेवीची बरोबरी करावी, म्हणून इतका वेळ गप्प बसलेल्या सीतम्माने चित्रादेवीला प्रश्न केला. भाबडी पोर !

" हं ! " पण त्यावर चित्रादेवी आपल्या नाकाचा शेंडा उडवून तिच्या

अज्ञानाला तिरस्काराने हंसली मात्र. नंतर तिच्याकडे दुर्लक्ष करून ती माझ्याकडे वळून म्हणाली, " मग काय, पसंत आहे ना कल्पना ? " माझे मत ऐकण्यासाठी ती उत्सुक झाली होती.

तिची कल्पना अद्भूत आणि नाविन्यपूर्ण होती हें खरें, आणि ती अमलांत आणली असता आम्हांला खोऱ्याने पैसे ओढता आले असते हेहि खरे; शिवाय नवीन खर्च काही नाही; हाहि एक मोठाच फायदा होता. परंतु असले नृत्य करण्यास कायद्याची अडचण होती ना !

" कल्पना उत्तम आहे पण त्याला कायद्याची अडचण येईल. शिवाय इतकं क्रातिकारक नृत्य आजच्या थोड्याशा का होईना, पण जुनाट कल्पना बाळगणाऱ्या समाजाला पेलायचंहि नाही. ही कल्पना कालाच्या अतिशय पुढं आहे, त्याबद्दल मी तुमच अभिनंदन करतो. आणखी अडचण म्हणजे ईव्हची भूमिका करायला कोण तयार होईल ? " मी तिची कल्पना अव्यवहार्य असल्याचें निरनिराळ्या अडचणी काढून सागितले.

" ते कायद्याबियद्याच तुम्हीच पाहून घ्या बाई ! मी बॅरिस्टरची बायको असले तरी मला कायदाबियदा समजत नाही हो! " असे म्हणून चित्रादेवी आपल्याच विनोदाला थोडीशी हसली. " पण ईव्हच काम करायला कोणीच तयार नसेल तर माझी तयारी आहे. कलेच्या सेवेसाठी काय वाटेल ते करीन मी! "

आता मात्र माझे आइस्क्रीमच झाले – धीटपणात मूळच्या अकुलीन सीतम्माला मागे सारण्यासारख्या गोष्टी करून कुलीन चित्रादेवीनं माझ्यावर चागलीच छाप पाडलेली असली तरी, तिचा धीटपणा व कलोपासना इतक्या थराला जाईल ही मला कल्पना नव्हती. मी त्या आश्चर्याच्या धक्क्यातून जागा झाल्यावर म्हटले, " छे छे ! ते जमणार नाही. तूर्त आपण असं करूं. आपल्या नेहमीच्या नृत्यांत सीतम्माऐवजी तुम्हांलाच काम देऊं. " ही कल्पना माझ्या डोक्यांत आज बरेच दिवस होती व मी चित्रादेवी नृत्यात तरबेज होण्याचीच काय ती वाट पाहात होतों. चित्रादेवीच्या समाजांतल्या दर्जामुळे एकच खळबळ उडेल आणि खेळांना खूप गर्दी होईल हा माझा अंदाज होता. आता चित्रादेवी नृत्यकलेंत बरीच प्रवीण झाली होती. शिवाय अलिकडे रामय्याच्या मदिराभक्तीचा आणि चढेलपणाचा मला बराच त्रास होऊं लागला होता. जेव्हा-तेव्हा तो सीतम्माला घेऊन मंडळी सोडण्याची धमकी देई; तेव्हा त्याला जरासें

ह्यामुळे वठणीवर आणतां येईल,असाहि माझा एक डाव होता. माझी कल्पना मांडून मी चित्रादेवीला प्रश्न केला, " मग आहे का तुमची तयारी ? उद्याच्याच खेळापासून तुम्हाला नायिका करूं ! "

माझे हे बोलणे ऐकतांच चित्रादेवीचा चेहरा जितका खुलला, तितकाच सीतम्माचा पडला. चित्रादेवीने माझ्याकडे एक मार्दवयुक्त व सीतम्माकडे विजयोन्माददर्शक कटाक्ष फेकला.

" मग तुम्ही येत नाही का आज ? " हा सर्व प्रकार असह्य होऊन चिडून सीतम्माने मला निर्वाणीचा प्रश्न केला.

" अ ? छे आता मला नवीन जाहिराती तयार केल्या पाहिजेत. " मी म्हटले.

" बरं तर ! मी जाते. " एवढे बोलून सीतम्मा आपल्या उंच टाचांचे बूट खट्खट वाजवीत, डिवचलेल्या नागिणीप्रमाणे फुत्कार टाकीत निघून गेली.

ती दृष्टीआड होईपर्यंत तिच्याकडे नीट पाहून नतर तिरस्काराने हसून चित्रादेवी म्हणाली, " काय पण मध्ययुगातला पोषाख केला आहे ! त्या मनगटापर्यंत पोलक्याच्या बाह्या काय, तो घट्ट गळा काय, तो कासोटा काय-मारते, सोगासारखी पावडर काय फासली आहे, आणि ऐट तर आणली आहे कुलीनपणाची ! कुलीनाचा पोषाख असा नसतो म्हणावं. कुलीनपणाचा आव आणून कोणी कुलीन होत नाही. तिथ पाहिजे जातीचे. कवीप्रमाण कुलीनहि जन्मावा लागतो. "

तिच्या शेवटच्या वाक्याने आम्ही दोघेहि खूप हसलों.

पहिल्यापहिल्यान नाही, तरी नंतर आमच्या मंडळीच्या एकाच म्यानांत रोहिणीदेवी आणि चित्रादेवी ह्यांच्या रूपातल्या दोन तलवारी ठेवण्याचे परिणाम मला जाणव् लागले. ह्या प्रकाराची मला आधीच कल्पना होती; पण तसे केल्यावाचून गत्यंतरहि नव्हते. रामय्याला आपल्यावाचून मंडळीचे अडून राहात नाही हे कळून आले आणि निराशेमुळे तो जास्तच दारू पिऊं लागला. बिचाऱ्या सीतम्माच्या हृदयावर मात्र आघात झाला.तिची वागणूक पहिल्यापासून माझ्याशी नम्रतेची होती. तिला ही शिक्षा नको होती. परंतु सुक्या-बरोबर ओलेहि जळतें ह्या न्यायाने रामय्याच्या चुकीचें फळ तिलाहि भोगणें प्राप्त होते. अलिकडे तिचें महत्त्व एकदम कमी झालें होतें, आणि चित्रादेवीबद्दल

तर तिच्या मनांत मत्सराचा वणवाच पेटला होता. त्याला बरीच अंतस्थ कारणेंहि होतीं. मालनमुटकून कुलीन केलेल्या सीतम्मापेक्षा जन्मजात अस्सल कुलीन चित्रादेवीनं माझ्यावर अधिक छाप मारावी हें साहजिकच होतें. तिचे नृत्याचे कार्यक्रम यशस्वी झाले आणि तिच्या कुलीनपणाबद्दल कोणालाच शंका नसल्यामुळे तिच्या कलोपामनेची अधिकच तारीफ होऊं लागली. तिच्या नांवामुळे परत आमची कंपनी जोमाने चालू झाली. साहजिकच चित्रादेवीचे प्राबल्य वाढले. पण अशा रीतीने मडळी वरपागी जरी जोरांत होती, तरी ती आतून पोखरली जात होती. सुरूंग भरून तयार होता. केव्हा ठिणगी पडेल हेंच पाहायाचे होतें. आणि तसा दिवसहि लवकरच आला

त्या दिवशी दुपारी मी ऑफिसमध्ये हिशेब करीत होतो. नुकतेच सीतम्माचें आणि माझें भांडण होऊन, तिच्या कटकटीला कंटाळून मी तिला 'तू कंपनी सोडून गेलीस तरी मला पर्वा नाही' असे जिव्हारी बसणारे शब्द बोललों होतों. माझें कामाकडे नीट लक्ष नव्हते. इतक्यांत रामय्या आला. त्याचे डोळे अर्धवट रागाने आणि अर्धवट दारूने तारवटलेले होते. तो थेट माझ्या टेबलाशीं येऊन उभा राहिला आणि गुर्मीत म्हणाला, "काय मालक, काय चालवलंय् तुम्ही हें आजकाल ?"

"काय झालं ?" मी बेपर्वाईने प्रश्न केला.

"काय झालं ? तुमची ही अलिकडची चित्रादेवीशीं होत असलेली वागणूक कुलीनपणाला शोभत नाही !" गेलेला झोक साभाळण्यासाठी टेबलाचा आधार घेत तो म्हणाला.

ते खरे होते; पण हे शब्द दारूची घाण येत असलेल्या रामय्याच्या तोंडांतून बाहेर पडतील अशी मला कल्पना नव्हती.

"आणि तुम्ही रोहिणीदेवीचा मघां अपमान केला! तिला चित्रादेवीसमोर तुम्ही सीतम्मा म्हणालां. तुम्हांला कांही वाटत नाही अशी वागणूक ठेवतांना ?" रामय्या म्हणाला.

आता मात्र मी रागावलों आणि म्हणालों, "बरं मग ! मी इथला मालक आहे. आणि त्या सीतम्माचा अपमान केला तर त्यांत काय मोठंसं झालं ? रस्त्यावरून भीक मागत फिरत होती ते विसरलांत वाटतं ? म्हणे सीतम्माचा अपमान केला ! हूं ! 'कुलीन' 'कुलीन'

म्हणून डंका वाजवला, तर खरंच कुलीनपणाचा आव आणला. बोलून चालून रस्त्यावरची नाचणारी पोर . . . . "

" चूप ! " मला मध्येच अडवून रामय्या ओरडला, " श्रीमती रोहिणी-देवीबद्दल असे उद्‌गार काढणाऱ्याची जीभ ओढून काढीन. कोणाला नाचणारी पोर म्हणता ? श्रीमती रोहिणीदेवी ही एक कुलीन स्त्री आहे. "

" ती कुलीन ? " मी आश्चर्याने आणि उपहासाने विचारले.

" होय. श्रीमती रोहिणीदेवी कुलीन आहे.आज सर्व जग तिला उच्चकुलो-त्पन्न आणि कुलीन म्हणून ओळखत आहे. ती कुलीन आहे. माझ्यासमोर असले शब्द पुन्हा काढल्यास मी ते ऐकून घेणार नाही. " एवढं बोलून तो जरासा थांबला व परत बोलू लागला,

" त्या चित्रादेवीच्या नादी लागून तुम्ही कुलीन रोहिणीदेवीला फसवतां आहां; ही तुमची वर्तणूक कुलीनपणाच्या सदरात येत नाही. मालक, आपली वर्तणूक लवकरच सुधारा, अशी माझी सूचना आहे. " एवढं बोलून तो झिगत झिगत निघून गेला.

हे सर्व ऐकून मी तर आश्चर्याने ' आ ' च वासला ! एकूण सीतम्मा कुलीन आणि आम्ही उच्चकुलोत्पन्न अकुलीन अ !

थोड्याच वेळात चित्रादेवी आली नसती, तर माझी मन:स्थिति मोठी विचित्र झाली असती. तिला मी सर्व प्रकार सांगितल्यावर ती म्हणाली,

" असेच हे लोक. कितीहि झाले तरी अकुलीन. अकुलीनासाठी कला नाही. कलेची सेवा कुलीनच करतील. तुम्ही काही भिऊं नका. सीतम्मा आणि रामय्या गेले तर बेलाशक जाऊं द्या. मी तर आहे ना ? मी काही अशी भाडून जायची नाही. अहाहा ! कला-कलेची सेवा—कलेची जोपासना ! त्यात किती आनंद वाटतो मला ! "

तिच्या ह्या भाषणाने मला बराच हुरूप आला आणि चारपांच दिवसातच रामय्या—सीतम्माने आमच्या मंडळीतून गाशा गडाळला.

त्यावेळी सीतम्मा रडली आणि चित्रादेवी मनापासून हसली.

ह्या अंतस्थ भानगडी झाल्या तरी आमची कंपनी जोमांत होती. चित्रा-देवीसारखी कलेसाठी कला ह्या तत्त्वाबरहुकूम वागून मनापासून आपलें काम करणारी हुषार नायिका असल्यावर कां नाही आमची कंपनी सुरळीत चालणार ?

परंतु परत आमच्या कंपनीचे ग्रह वाईट आले.

आमच्या मंडळीत राहून कलेची निर्भेळ सेवा करण्याचा निश्चय श्री. चित्रादेवीनी मंडळी सोडीपर्यंत पूर्णपणें पाळला. एक दिवस एका सिनेटोनचा शेटचा तिच्याकडे आला आणि आमच्याकडे भत्ता देणग्या वगैरे मिळून जी रक्कम होई त्यापेक्षा पचवीस रुपये अधिक पगार देण्याचे त्याने कबूल करतांच कलोपासक श्री. चित्रादेवीनीहि आमच्या मडळीतून प्रयाण केले !

आणि अशा रीतीने [illegible] क्षणकाल चमकून गेलेली, आमची 'श्री कथाकली नृत्यकला मंडळी' रसिक मंडळीत न भूतो न भविष्यति अशी खळबळ उडवून देऊन अखेरीस विराम पावली !



# सुटका !

सीतापूर गावाच्या एका टोकाला तिथला तुरुंग होता. सीतापूर गाव छोटा होता अन् तिथला तुरुगहि छोटा होता. खर पाहतां त्या तुरुंगाला तुरुंग म्हणण म्हणजे 'तुरुग' ह्या शब्दाचा अपमानच होता. 'तुरुग' म्हणताच आपल्या डोळचासमोर भाल्यासारखे तीक्ष्ण गज लावलेल्या ऊच ऊंच भिती उभ्या राहतात. आणि त्या भितीच्या आड कोण भयंकर गुन्हेगार असतील, त्याना तिथं काय काय भयकर शिक्षा दिल्या जात असतील, ह्याविषयीच्या अस्पष्ट कल्पना आपल्या मनात उत्पन्न होऊन मन भयाकुल होतं. परतु सीतापूरचा तुरुग असा नव्हता. गावच्या एका टोकाला असलेल्या वाडचाचंच रूपातर तुरुगात करण्यात आलं होतं. त्या वाडचाला एक भरभक्कम गजाचा दरवाजा लावण्यात आला होता आणि आंतील चौकाभोवती असलेल्या पडव्यावर खोल्या पाडण्यात आल्या होत्या. सीतापूर पेठचात पकडण्यात आलेल्या गुन्हेगाराच, जिल्ह्याच्या तुरुंगांत पाठविण्यापूर्वीच एक मुक्कामाच ठिकाण, एवढाच त्या सीतापूरच्या तुरुगाचा खरा उपयोग होता.

ह्या तुरुंगाच्या एक नबरच्या खोलीत संतू शिदे, सर्कशीच्या पिजऱ्यांतील वाघाप्रमाणे अस्वस्थ मनानं येरझाऱ्या घालीत होता. चौकटीच्या कापडाची लांडी चड्डी व बडीवजा एक कुडतं, ह्या कैद्याच्या पोषाखांत तो होता. सूर्यास्त होऊन गेला होता आणि निशेच्या स्वागताकरता आकाशात आकाशदेवतानी पेटविलेल्या दोनचार मशाली चौकातील मोकळचा भागातून त्याला दिसत होत्या. सीतापूरमधील दिवसाचे ऐकू येणारे जीवनकलहाचे पडसाद आता बंद पडले होते. मृत्यूच्या जासूदाप्रमाणे भासणारी एकदोन वटवाघुळ चौकांतून

फेऱ्या घालीत होती, व मध्येच कशावर तरी झेप घातल्याप्रमाणे एकदम खालीं येत होती. साऱ्या खोलीभर मच्छरं घोंघावत होती. लोखंडी दरवाजावरचे दोघे पहारेकरी आपले कपडे साफसूफ करून आठ केव्हा वाजतात अन् रात्रपाळीचे पहारेकरी केव्हा येऊन आपणाला मोकळे करतात, ह्याची उत्सुकतेने वाट पाहात होते.

सतू चिडला होता. देशाच्या स्वातंत्र्याकरता लढणाऱ्या त्याच्यासारख्या देशभक्ताला कैदेत ठेवून त्याच्यावर बंदुका घेऊन पहारा करणाऱ्या त्या आपल्या देशबांधवांची त्याला चीड आलीहोती—त्यापेक्षाहि त्याला आपल्या सहकाऱ्यांची अधिक चीड आली होती. महादू, देवमन, पाराजी, वगैरे त्याचे सहकारी काय करीत होते ? त्याला सोडविण्याची त्यांनी अजून कांहीच कशी हालचाल केली नव्हती ? त्यांचा तो पुढारी होता. त्यांच्या सहाय्यानं त्यानं आतापर्यंत दोन-तीन पोस्टमनांना लुटलं होतं, टेलिग्राफच्या तारा तोडल्या होत्या, पोलिसचौक्या जाळल्या होत्या. त्याचे ते सहकारी त्याच्या सारखेच धाडसी होते. त्यांच्याजवळ पोलिसांकडून चोरलेल्या बंदुकाहि होत्या; मग ते अजून स्वस्थ कसे ? उद्या सकाळी जिल्ह्याच्या गावी त्याची रवानगी करण्यांत येणार होती. मग त्याची सुटका होण्याची कांहीच आशा नव्हती. त्याच्या सुटकेचा प्रयत्न केलाच, तर तो आज रात्रीच व्हावयास पाहिजे होता. अजून किती तरी कार्य करायचं होत. आपलं तारुण्य, आपली बुद्धि, आपली शक्ति, आपली हिंदमाता गुलामगिरीतून मुक्त करण्याकरता त्याला वेंचायची होती. पण तें आता फारसं शक्य दिसत नव्हतं. त्याच्या सर्व शक्ति कुठल्यातरी तुरुंगांत खडी फोडण्यातच खर्च होणार अशीच चिन्हं आता दिसू लागली होती.

तरीहि पण त्याला आशेला एक जागा होती. आज दुपारीच, तुरुंगाची टेहळणी करीत जाणाऱ्या पाराजीला त्यानं पाहिलं होतं. आपले सहकारी आपली सुटका करण्याकरता अजूनहि काही तरी प्रयत्न करतील, अशी त्याला आशा होती......

आठाचे ठोके पडले. लोखंडी दरवाजाशी खाड्खाड् आवाज झाला. बंदुकांना संगिनी लावल्याचा खट्खट् आवाज झाला. हवालदारनं फाड्फाड् दिलेले हुकूम त्याच्या कानांवर आले आणि पहारा बदलला.

" भाऊसाहेब–" सन्तूच्या कानांवर शब्द आले. आपल्या तंद्रीतून तो

एकदम जागा झाला. रात्रपाळीचा एक पहारेकरी त्याच्यासमोर उभा होता आणि आदरानं त्याच्याकडे पाहत होता.

" काय ? " सन्तूनं जरा कठोरपणानंच विचारलं.

पहारेकऱ्यानं संतूकरता आणलेला पाण्याचा लोटा गजाशी ठेवला आणि त्यानं विचारलं, " भाऊसाहेब, ओळखलं नाही का तुम्ही मला ? "

अंधुक प्रकाशांत संतूनं त्याच्याकडे निरखून पाहिलं. आपल्या स्मरण-शक्तीला त्यानं खूप ताण दिला, पण त्याला त्याची ओळख पटली नाही. तो म्हणाला, " तुम्ही पोलिस आहांत एवढंच मी ओळखतों. "

" होय भाऊसाहेब. " तो पोलिस मृदु स्वरांत म्हणाला, " मी पोलिस तर आहेंच. पण ती ओळख नाही म्हणत मी...संताजी शिंदे तुम्हीच ना ?"

" हो "

" मग तुमचे माझ्यावर फारच मोठे उपकार आहेत. " हात जोडून तो पोलिस म्हणाला.

" पण तुम्हांला पाह्यलेलं मला नाही आठवत ! "

" कसं आठवेल तुम्हाला ? मोठं माणूस तुम्ही ! आम्ही काय आपले गरीब शिपाई !" नंतर थोडंसं थांबून तो म्हणाला, " आठदहा वर्षांपूर्वीची एक गोष्ट आठवते का तुम्हाला ? नदीला खूप पाणी आलं होतं. असा पाऊस कधी झाला नाही. माझी घरधनीण नदीवर कपडे धुवायला गेली होती. बरोबर तिनं लहानग्या शंकऱ्यालाहि नेल होत. अवखळ पोर खेळतां खेळता नदीत पडलं अन् गटागळ्या खात पुरात वाहत जाऊं लागलं. घाटावर इतके लोक होते, पण पोराला वाचवण्याकरता त्या पुरांत उडी टाकण्याची कोणाची छाती झाली नाही. पण त्यावेळी एक मर्द गडी तिथं होता. त्यानं आपले कपडे काढले अन् त्या दुथडी वाहणाऱ्या नदीच्या तांबड्या पाण्यांत स्वतःला फेकून दिलं. साहेब, तो मर्द गडी आपणच. आठवतं का तुम्हांला ? "

" हं, आता आठवलं. तुमचा मुलगा का तो ?... कसा आहे तो आता ?" संतूनं सहज विचारलं.

" आता तर खूप वाढलाय् तो. माझ्या खांद्याला लागतो...साहेब, त्या दिवशीं तुम्ही तिथं नदीवर नसतां, तर पोर कांही माझ्या हाती लागत नव्हतं. तुम्हीच पोराला जीवदान दिलं. तुमचे फार उपकार आहेत... "

त्यावर काय बोलावं हें सतूला सुचेना. त्याच्याकडे दुर्लक्ष करून तो फिरून येरझाऱ्या घालू लागला.

किती तरी वेळ झाला तरी तो शिपाई उभाच असलेला पाहून संतूनं म्हटल, " बरय्, जा आता तुम्ही आपल्या कामाला–"

शिपायाचा चेहरा विचारमग्न झाला होता. एकाद्या पूज्य व्यक्तीकडे पाहावं, त्या दृष्टीन तो सतूकडे पाहात राहिला होता. तो म्हणाला, " भाऊसाहेब, तुमच्यासारख्या मोठ्या कुळांतला माणूस, शिकलेला, जवान अन् मर्द. देशा-करता हातावर शीर घेऊन निघालेला... भाऊसाहेब, सरकारची नोकरी केली तरीबी आम्हाला माणसाची किमत थोडी फार कळते... सोन्यासारखं तुमचं शरीर, ते काय अस तुरुगाच्या कोठडीत, पिसवामच्छरांच्या संगतीत, अन् घाणीत ठेवायच ? नाही, भाऊसाहेब, देशाला तुमची गरज आहे. देश तुमची वाट पाहतोय् माझ्या पोराला तुम्ही वाचवलं, आम्हाला सुखी केल. तसं अजून तुम्हाला पुष्कळाना सुखी करायच आहे तुमचा जन्म तुरुंगात कुजण्याकरता नाही ! "

शिपाई मनापासून बोलत होता. त्यानं पेहेरलेल्या खाकी गणवेशाच्या आंत आपणाविषयी इतकी सहानुभूति,इतकी विचारशक्ति अन् जिव्हाळा असेल, अशी सन्तूला कल्पना नव्हती. शिपायाचं ते बोलणं ऐकून किंचित् आश्चर्यानं तो तसाच उभा राहिला. शिपाई बोलू लागला, " भाऊसाहेब, तुमचे आमच्यावर इतके उपकार आहेत की, माझ्या कातडीचे जोडे करून तुम्हाला घातले तरी ते फिटणार नाहीत ! तुमच्या उपकारातून थोडं तरी उतराई व्हावं म्हणून...... "

एवढं बोलून तो एकदम थबकला. त्यानं एकदा चौफेर नजर टाकली. दुसरा पहारेकरी दरवाजाशी एका स्टुलावर डोक्याचा घाम पुशीत बसला होता. दरवाजावर लावलेल्या एका भल्यामोठ्या घासलेटच्या दिव्याच्या प्रकाशात तो स्पष्ट दिसत होता. त्याचं त्यांच्याकडे मुळीच लक्ष नव्हत. बाकीचा सारा तुरुंग रिकामाच होता. आपलं बोलणं ऐकण्यास कोणी नाही, असं पाहून तो शिपाई हलक्या आवाजांत सन्तूला म्हणाला, " भाऊसाहेब, तुम्ही पळून जा. मी तुमची सुटका करतो. "

त्याचे हे शब्द ऐकून संतू एकदम दचकलाच. त्याला तें खरं वाटेना.

" खरंच सागतों तुम्हाला. मी तुम्हांला बाहेर सोडून देतो. " तो शिपाई पुन्हा म्हणाला.

" पण तो दुसरा शिपाई आहे ना ?" सन्तूनं शंका व्यक्त केली.

" त्याला मी सिगारेटचं पाकीट आणण्याकरता बाजारात देतों पाठवून. तसं पहारा सोडून त्याला जातां येत नाही; पण सिगारेटकरता तो वाटेल तें करील. " थोडंसं हसून तो शिपाई म्हणाला.

" आणि कैदी पळून गेला म्हणून तुम्हाला शिक्षा होईल ती ? " संतूनं विचारलं.

" होऊं द्या झाली तर ! तुमचे आमच्यावर एवढे उपकार आहेत ! नोकरी जाईल, फार तर वर्षभर खडी फोडीन ! पण ते मी आनदान करीन ! " तो शिपाई अगदी सहज म्हणाला. इतक्यात एक कल्पना सुचून तो म्हणाला, " नाही तर असं करा. माझे हातपाय बाधून टाका. तुम्ही फार आरडाओरड करीत होता म्हणून मी तुमच्या खोलीशी गेलो, तुम्ही मला शिव्या दिल्या, म्हणून समज देण्याकरता दार उघडून मी आंत गेलो, तो तुम्ही माझ्यावर झडप घालून, माझे हातपाय बांधून पोबारा केला असं मी सागेन फौजदाराला "

सतूनं थोडा विचार केला त्यालाहि ती कल्पना पटली. पण त्याला अजून एक अडचण राहिलेली दिसत होतीच. त्यान विचारल, " तुरुगातून सुटलों तरी मला आमच्या गुप्त तळावर म्हणजे इथून वीस एक मैल तरी जायचं आहे. सारी रात्र चाललो तरी एवढ अतर काटणार नाही. रस्ता झाडाझुडपांतून नि जगलादऱ्यांतून आहे. वाटेत दोनचार गाव लागतात. मग ह्या कैद्याच्या पोषाखात मला कुणी पाहिल तर मग सारंच फुकट जायच नि तुमची मात्र नाहक नाचक्की व्हायची ! "

शिपाई ह्या अडचणीपुढे निरुत्तर झाला. आपण सतूकरता एवढा स्वार्थत्याग करावयास तयार असूनदेखील आपणाला तो करता येऊं नये, त्याचं त्याला वाईट वाटल. ह्यावर काय तोड काढावी, ह्या विचारात तो गर्क झाला. अखेरीस एक कल्पना त्याला सुचली आणि हर्षभरित स्वरांत तो म्हणाला, " भाऊसाहेब, मग अस करा ना ! माझा हा पोशाख तुम्ही चढवा अन् मग खुशाल जा. दिवसाचाबी कुणाला संशय यायचा नाही ! "

सन्तूनं थोडा विचार केला. हो. असं करावयास कांहीच हरकत नव्हती. सुटकेचा हा मार्ग सुरक्षित होता. त्यानं ह्या योजनेला संमति दिली.

" आलोच तर मी आता त्या शिपायाला दूर लावून–" असं म्हणून तो शिपाई दरवाजापाशी गेला आणि थोड्याच वेळांत त्या दुसऱ्या शिपायाला पानपट्ट्या आणि सिगारेट आणावयास धाडून देऊन परत आला. सन्तूच्या खोलीचा दरवाजा उघडता उघडतां तो म्हणाला," ह. भाऊसाहेब,चला. आटपा आता लवकर. तो शिपाई परत येण्याच्या आंत दूर गेल पाहिजे तुम्हांला. "

एवढ बोलेतो त्यानं आपले खाकी कपडे उतरविण्यास सुरुवात केली होती. त्यानं काढलेला एकेक कपडा अंगावर चढविण्यास सन्तूनं सुरुवात केली. थोड्याच वेळात त्यान सर्व कपडे पेहरले.

" काय ? कसा दिसतो मी ह्या पोषाखात ? " मनावरचा ताण कमी व्हावा, म्हणून सन्तून विचारल.

" वा ! अक्षी डी. एस्. पी ! " तो शिपाई कौतुकान पाहात म्हणाला व दोघेहि हसले.

" बरं. जातो तर मी ! " जाण्याविषयी अधीर झालेला संतू म्हणाला

" वा, अजून एक राह्यलच आहे ना ! " तो शिपाई हसून म्हणाला, " मला कैद करायच राह्यलय् ना ? हा घ्या रुमाल . "

सन्तून त्या शिपायाच्या तोडांत एक बोळा कोबला व त्याचे हातपाय करकचून बाधले. त्या शिपायाला वेदना होत असाव्यात ; पण त्याच्या तोंडावर समाधान विलसत होतं. अनत हालअपेष्टा सोसून काशीयात्रा पार पडल्यावर एखाद्या भाविक माणसाला वाटावं, तस समाधान त्याला वाटत असलेलं दिसून येत होत. त्याच्याविषयी संतूला आदर वाटू लागला. तो म्हणाला, " तुमची नोकरी गेली अन् तुम्हाला शिक्षा झाली तरी कुटुबाची काही काळजी करू नका. त्यांची सर्व काळजी आम्ही घेऊं ! बरंय्. येतो आता. "

शिपायानं बोळा कोबलेल्या तोडानं हसण्याचा प्रयत्न केला. करकचून बांधलेले हात निरोप देण्याकरता हलवून पाहिले, पण ते प्रयत्न निष्फळ झाले. सन्तूनं त्याच्या डोळ्याकडे पाहिलं. शिपायाला जे कांही सांगावयाचं होतं, तें ते डोळे जिभेपेक्षाहि उत्तम रीतीनं सांगत होते.

त्या पोलिसी बुटाचा शक्य तेवढा कमी आवाज करीत, सन्तू मोठया दरवाजांतून सावधगिरीन बाहेर पडला. वर टांगलेल्या मोठ्या दिव्याच्या प्रकाशांतून बाजूला सरून तो भितीच्या आडोशाला अंधारांत उभा राहिला. तुरुंगांतील कुबट वातावरणातून बाहेरील स्वच्छ हवेत आल्याबरोबर त्यानं छाती भरून एक श्वास घेतला.

त्याच्या मनात कल्पना आल्याशिवाय राहिली नाही; आपण छोटया तुरुंगातून सुटून आता एका मोठया तुरुंगात येऊन पडलों आहोत; ह्या तुरुगाला एका बाजून हिमालय, हिदुकुश ह्या पर्वतासारख्या मोठमोठया उत्तुग भिती आहेत, तर दुसऱ्या दोन बाजूना सिधुसागर व गगासागर ह्यासारखे अवाढव्य खंदक आहेत. ह्या भल्याथोरल्या तुरुंगात चाळीस कोटी कैदी आहेत अन् त्यानी दास्यशृखलातून मुक्त व्हावं, म्हणून तर आपण यथाशक्ति प्रयत्न करीत आहोत.

तो एकदम भानावर आला. त्यान गावाच्या दिशेनं पाहिल. रस्त्यावरून अंधार होता. सर्वत्र सामसूम होती. दूरवर एका दुकानातील प्रकाशाचा मद झोत रस्त्यावर पडला होता व त्यांतून सिगारेट आणावयास गेलेल्या त्या दुसऱ्या पोलिसाची परत फिरलेली आकृति अस्पष्टशी दिसून येत होती. त्यान समोर पाहिल. तिथ दाट झाडी होती. तिच्यातील अधारात काजवे चम्चम् करीत होते. झाडाचे बुधे मस्त हत्तीच्या भरदार सोंडीप्रमाणे दिसत होते. रातकिड्याची कर्णकटु किरकिर अविरत चालली होती. काही तरी भयकर प्रकार घडून येणार आहे, हे ठाऊक असलेल्यान श्वास रोखून त्या घटनेची वाट पाहात असावं, त्याप्रमाणे वृक्षाची ती राई उभी असल्याप्रमाणे त्याला वाटल

आता क्षणाचाहि विलब न करता त्या झाडीतील अधारात लुप्त झाल पाहिजे; सकाळपर्यंत आपण खूप दूर जाऊ. मग उजाडल्यावर आपल्या पोलिसच्या गणवेशामळे आपला कुणाला सशय येणार नाही. एकदा आपल्या सहकाऱ्याना जाऊन मिळालं की झालं...

त्यानं पुन्हा एकदा टेहळणी केली. एकदा कानोसा घेतला आणि त्या झाडीच्या दिशेनं एक पाऊल पुढ टाकल.

त्यानं एक पाऊल पुढं टाकताच त्या झाडीत पाचोळा सळसळल्याचा आवाज त्याच्या कानावर आला. दोनतीन पुसट छाया इकडून तिकडे धावल्याचा त्याला भास झाला. त्यानं आडोसा घेण्याकरता फिरून एक पाऊल मागं टाकलं मात्र—

कानठाळ्या बसविणारा बंदुकीचा आवाज झाला आणि दुसऱ्याच क्षणी वर्मी गोळी लागून तो जमिनीवर कोलमडून पडला.

तीन आकृति झाडीतून धावत आलेल्या अन् तुरुंगाच्या उघड्या असलेल्या दरवाजातून बंदुका रोखून आत शिरलेल्या त्यानं पाहिल्या. दरवाजा-वरील मोठ्या दिव्याच्या उजेडात त्याचे चेहरे त्याला क्षणभरच अस्पष्टसे दिसले...

त्या माणसांनी तुरुंगांत शिरतांच 'सतू, संतू' म्हणून मारलेल्या हाका त्याच्या कानावर येऊन पडल्या. त्यान 'ओ' देण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या कोरड्या पडलेल्या घशांतून शब्द उमटेना.

क्षणाक्षणाला त्या हाकातील अधीरता वाढतच होती. अखेरीस उत्तर येत नाही, असं पाहून त्या हाकाहि बद पडल्या. मिनिटाभरातच ते तिघे जितक्या अचानकपणें आले होते, तितक्याच अचानकपणे त्या झाडीत अदृश्य झाले जाता जाता त्यानी उच्चारलेले शब्द सतूच्या कानावर पडले, "बाकी सन्तू धाडशी खरा! आपण येण्यापूर्वीच त्यान आपली सुटका करून घेतली!" तो स्वर महादूचा होता

"काय युक्ति लढवलीन् त्यान कुणास ठाऊक!" देवमन म्हणत होता.

"तो शिपाई जीवत आहे काय रे?" हे वाक्य पाराजीनं सतूकडे पाहूनच उच्चारल असावं. तो पुढं म्हणाला. "काय नेम पण नेम आहे!..."



# फौजदार आणि काव्य !

आपला तपास करावयास आलेले फौजदारसाहेब आपल्या कवीच्या सोगाला हातोहात फसलेले पाहून सदू सोमणाला गमत वाटली. — पण आश्चर्य मात्र वाटल नाही. आपणांसारख्या वेषातरात पटाईट असलेल्याशी दोन हात करण्याचा प्रसग त्या पोरसवदा फौजदारावर यावा, ह्याबद्दल त्याला त्या फौजदाराची कीवच वाटली. त्याच्याविषयीच्या साऱ्या सशयाचं निराकरण होऊन परत जाणाऱ्या फौजदारसाहेबाच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहून सदू सोमण स्वत:शीच हसला आणि अभिमानानं पुटपुटला, " पोरगा आहे झालं ! केस पाढरे झालेल्या बडचाबडचा इन्स्पेक्टराच्या हातावर तुरी दिली आहे मी ! मग ह्या कालच पोलिस ट्रेनिग स्कूलमधून बाहेर पडलेल्या पोराची गोष्ट ती काय ? "

तरीपण, आपला पोलिसाना सशय आलेला आहे आणि ते आपल्या पाळतीवर आहेत,येवढं मात्र त्याला समजून चुकलं. त्याच्या सशयाचं आपण तात्पुरत समाधान केलेलं असल, तरी आता शक्य तेवढचा लवकर आपल काम उरकून घेतलं पाहिजे, हे खास. ह्याच विचारात त्यान आपली दृष्टि खिडकीतून दूरवर लावली. चादगावचा छोटासा रेल्वेचा पूल त्याच्या दृष्टीस पडला. त्याचे बाहू फुरफुरले आणि तो म्हणाला, " बस्स ! आजच... आजची अमावास्येची काळीकाळी रात्र-सारी सृष्टि दाट काळचा वस्त्राखाली झाकली जाईल—मोठा स्फोट होईल—पुलाचा दगडन्‌दगड अंतराळात फेकला जाईल—मग पोलिसाची धावपळ सुरू होईल—बसा म्हणाव मग त्या फौजदारसाहेबाना माझा शोध करीत... "

१९४२ ऑगस्टमध्ये पेटलेल्या विध्वंसक चळवळीत भाग घेणाऱ्या एका टोळीचा सदू सोमण म्होरक्या होता. ह्या दोनतीन महिन्यांत त्यानं दहा पोस्टाच्या पेट्या, चारपाच पोलिस चौक्या आणि दोन रेल्वेचे छोटेसे पूल उध्वस्त केले होते. टेलिग्राफच्या तारा तर त्यानं बीसपंचवीस ठिकाणी तोडून टाकल्या होत्या. ही कामं तो अगदी बिनबोभाट करी.त्याच्या टोळींतील मित्रांना-देखील तो केव्हा कुठं असेल ह्याचा पत्ता नसे. वेषातर करण्यांत जसा सदू सोमण मोठा पटाईत, तसाच मोठा धाडसी अन् प्रसंगावधानी. एकदा टेलिग्राफच्या तारा तोडीत असतांनाच त्याला पोलिसाची चाहूल लागली. लगेच तो तारा दुरुस्त करणारा वायरमन बनला ! एकदा एक पोलिसचौकी पेटवून दिल्यावर तो लोकाच्या गर्दीत सापडला. तर तो एकदम जखमी पोलिसांना उपचार करणारा डॉक्टरच बनला ! विध्वसनाची कृत्यं करीत आणि सरकारच्या हातावर तुरी देत, तो गावोगाव फिरत होता. ‘ फरारी ’ इसमांत गणना होण्याचा मान त्याला मिळाला होता. सरकारी दृष्टीनं त्याच्या देहाची किमत आता वाढत वाढत तीन हजारापर्यंत येऊन पोहोचल्याचे जाहिरनामे लागले होते. पोलिसखातं व सदू सोमण ह्याच्यांतील लढाईला आता चागलाच रंग भरला होता.

फौजदारसाहेबाना आपण बनवलं आहे, ह्याची खात्री असली तरी सदू सोमणानं नुकताच घडलेला प्रसग पुन्हा एकदा मनश्चक्षूसमोर उभा केला आणि बोलण्याचालण्यात आपली कुठं एखादी चूक तर झालेली नाही ना ह्याची तो छाननी करू लागला.

त्यान भाड्यानं घेतलेल्या खोलीचा दरवाजा ठोठावला गेला, म्हणून त्यानं दार उघडलं होतं, तो साध्या पोषाखातील एक तरुण हातांत चामड्याची एक चपटी बॅग घेऊन उभा असलेला त्याला दिसला होता. सदून विचारल होतं.

“ कोण पाहिजे आपणांला ? ”

“ अं ? जरा काम आहे माझं. येऊं का आंत ? ” तो तरुण म्हणाला आणि सदूनं ‘ होय ’ किवा नाही म्हणण्यापूर्वीच तो खोलीतील एका खुर्चीवर स्थानापन्नदेखील झाला.

“ म्हणजे मी आहे विमाकंपनीचा एजंट ! आपण विमा उतरण्यास तयार आहांत किवा काय हे पाहण्याकरता आलोंय् मी... ”

'पॉलिसी' 'बोनस' वगैरे शब्द मधून मधून पेरून त्याची वटवट सुरू झाली होती. पण बोलतां बोलतां तो तरुण सदूच्या खोलीचं बारकाईनं निरीक्षण करून घेत होता. सदू मनांतल्या मनांत हसत होता. हं! विमाएजंट काय? विमाएजंटाचं सोंग घेऊन आपल्या खोलीची पाहणी करण्याकरता चांदगावचा पोरसवदा फौजदार आलेला आहे हे सदूनं त्याला पाहतांक्षणीच ओळखलं होतं. आपल्या नेहमीच्या प्रघाताप्रमाणं चांदगावला येतांच त्यानं प्रथम तिथल्या साऱ्या शांततेच्या रखवालदारांना पाहून ठेवलेलं होतं. त्यानं फौजदारसाहेबांना ओळखलेलं असलं तरी वरून मात्र तसं बिलकुल दिसू दिलं नाही.

चांदगावला आल्यापासून हा प्रसंग केव्हाना केव्हा तरी येणार, ह्याची त्याला खात्री होती व तो त्याचीच मोठ्या उत्सुकतेनं वाट पहात होता. आणि अखेरीस तो प्रसंग आज आलेला पाहून त्याला आनंदच झाला होता. एकतर पोलिसखात्याला बनविण्यांत त्याला मोठी गंमत वाटे, व दुसरं म्हणजे फौजदार-साहेबाना आलेल्या सशयाचं निरसन करण्याची संधि आयतीच त्याच्याकडे चालून आली होती.

फौजदारसाहेबांची विमाएजंट म्हणून वटवट चालू असतां, त्यांच्या दृष्टी-बरोबरच सदूची दृष्टीहि त्याच्या खोलीतील यच्चावत् वस्तूवरून फिरत होती. टेबलावर जुनाट मासिकाचे काही अंक पडले होते, कांही हस्तलिखित कागदहि होते. जमिनीवर विड्याची थोटकं, जळलेल्या काड्या आणि चोळामोळा करून टाकलेले कागदाचे तुकडे इतस्ततः पसरलेले होते. हलकेंच तो दाढी करण्याच्या आरशासमोर जाऊन उभा राहिला आणि आपले केस त्यांतून बोटं फिरवून त्यानं जरा अस्ताव्यस्त केले. त्याची दाढी आठदहा दिवसांची वाढलेली होतीच. तोंडावर त्यानं जरा बावळट रडवी कळा आणली आणि तो स्वतःशीच म्हणाला, "बस! आता माझा अवतार पाहून आणि खोलीची ही दुर्दशा पाहून, मी अस्सल कवि नाही असं म्हणण्याची कुणाची छाती आहे!"

"आपलं नांव काय?" थोड्या वेळानं फौजदारसाहेबांनी विचारलं.

"मी 'मधुप' ह्या नांवानं प्रसिद्ध आहे."

"म्हणजे? तुम्ही कविबिवी आहांत की काय?"

"हो"

" पण तुमच खरं नांव काय ? "

" चितामण लक्ष्मण गोरे . "

" धंदा ? "

" धदा काही नाही, म्हणून तर कविता करतों ! " ह्यावर दोघेहि हसले.

" मग इथ कशाला आलात ? "

" इथ ? कविता करण्याकरता. "

" कविता करण्याकरता ? "

" हो. किती सुदर नि रम्य वनश्री आहे इथली ! मी एक जानपद दीर्घ-काव्य लिहिणार आहे. त्यात चादगावचंच वर्णन करणार आहे. विशेषत: इथल्या रेल्वेच्या पुलाजवळचा देखावा तर नितात रमणीय आहे ! "

रेल्वेपूलाकडे त्यान पाहणी करण्याकरता दोनतीन चकरा मारल्या होत्या. किती सदर सहजतेन त्यान फौजदारसाहेबाच्या मनात त्यामुळे जे संशय निर्माण झाले असतील त्याच निरसन केल होत !

हा वेळपावेतो फौजदारसाहेब आपल्या जागेवरचे उठून सहज म्हणून खोलीतील सामानाची तपासणी करू लागले होते. त्यानी एक पुस्तक उचलून घेताच सदूचा चेहरा कावराबावरा झाला होता. त्यान त्या पुस्तकावर जवळ-जवळ झडपच घालून ते फौजदारसाहेबाच्या हातून हिसकावून घेतल. फौजदार-साहेबांचा चेहरा एकदम गंभीर झाला. ते पुस्तक आक्षिप्त असावं, किवा त्यांत सदूच्या कुणा साथीदाराच पत्र वगैरे लपवून ठेवलेलं असावं, अशा काही शका फौजदारसाहेबाच्या मनात उत्पन्न झालेल्या असाव्यात, हें त्याच्या चेहऱ्यावरून सदून ओळखलं. त्याला तेच पाहिजे होतं.

थोडया वेळान त्यानं ते पुस्तक टेबलावर ठेवून दिलं आणि जणू ते आपण तिथं ठेवलं आहे हे विसरूनच तो काही कामाकरता आतल्या खोलीत गेला. जरा वेळानं त्यानं बाहेर येऊन पाहिलं, तर ते पुस्तक जागच्या जागीच होतं, पण फौजदारसाहेबाच्या चेहऱ्यावर मात्र फरक पडला होता. मघाप्रमाणे आता त्याचा चेहरा गभीर विचारमग्न दिसत नव्हता. आपल्या गैरहजेरीत त्यानी ते पुस्तक चाळून पाहिलं असलं पाहिजे, ह्याविषयी त्यावरून सदूला खात्री पटली.

" मघा मी आपल्या हातून ते पुस्तक हिसकावून घेतल, ह्याबद्दल माफ करा. पण... पण... त्या पुस्तकात मला अत्यत पवित्र वाटणारी एक वस्तु मी ठेवलेली आहे.... माझ्या स्फूर्तिदेवतेचा फोटो आहे त्यांत ! "

पण फौजदारसाहेबानी त्याच्या ह्या बोलण्याकडे दुर्लक्षच केलं. ह्याच प्रसगाकरता सदून आधीच त्या पुस्तकात घालून ठेवलेला एका तरुणीचा फोटो त्यानी पाहिला होता आणि त्या पुस्तकात आक्षेपार्ह असं काही नाही, ह्याविषयी त्याची केव्हाच खात्री पटली होती. एखाद्या माणसाच्या मनांत मुद्दाम सशय निर्माण करून मग त्याच्या सशयाचं पुरेपूर निराकरण केलं तर मग तो मनुष्य आपणावर सर्वच बाबतीत विश्वास ठेवतो, ह्या मानसशास्त्रातील तत्त्वानुसार सदून आखलेली योजना सपूर्ण यशस्वी झाल्याच त्याला दिसून आल होत.

" बर मधुप, आता एखादी कविता तर म्हणून दाखवा तुमची. " फौजदार-साहेब खोलीची तपासणी व बोलण्याचे विषय सपले म्हणून सहज म्हणाले. त्याच्या आवाजांत आता मोकळेपणा खेळत असलेला सदूला उमगून आला होता

" हो. हो. अवश्य " आपल्या हस्तलिखित कविताची वही उघडीत मदू म्हणाला. आपण कवि आहोंत, अस सागितल्यावर साहजिक कोणीहि आपल्या कविता पाहावयास मागणार ह्याची त्याला प्रथमपासूनच खात्री होती व त्याप्रमाणे त्यान सारी तयारीहि करून ठेवली होती. त्यान काही जुनी कोपऱ्यांतली मासिक फूटपाथवर गोळा केली होती आणि त्यात प्रसिद्ध झालेल्या विशेष नामवत नसलेल्या कवीच्या काही कविताच सरळ वाङमयचौर्य केलं होत. त्या कविता आपल्या वहीत उतरवून घेतल्यावर त्या आपणच रचल्या अस जर सागितल तर कुणालाहि—विशेषत: पोलिसखात्यातील हडेलप्पी माण-साना तरी— मुळीच ओळखता येणार नाही, ह्याविषयी तो अगदी निश्शक होता. त्यान पूर्ण निर्धास्तपणान आपली हस्तलिखित कविताची वही उघडली आणि तो म्हणाला,

" कवितेचं नाव आहे— ' सुदरीस— ! ' कविता मुक्तछंदातली आहे. पर्वाच केली मी ती... ऐका...

" कपोल तव लाललाल
कीं गुलाब उत्फुल्ल,
दोन इराणी ?
भिरभिरती त्यांवरती
आस्वादत दोनच भुगे--
काळेकाळे--
--कुळकुळीत !
" हांससी मधुर, दिसते
तेव्हा रदनावलि शुभ्र
--की कुंदकळचा ?
" पाठीवरी रुळे शेपटा
हां ! हां ! आवर ! आवर !
ही करील माझ्या हृदया
--डंख,
कृष्ण नागिणी !
" मत्त गजाची गति आणिक
चोरिली कंबर सिहाची
(बारिक)
--चोर तूं ?
धीट बदमाष अन्--
बेरड !
" विनवी, चोरुं नको माझें
हृदय !
एकच !
हे सुदरी !"

ही कविता साभिनय व भेसूर आवाजांत म्हणून दाखविल्यावर सदूनं फौजदारसाहेबाकडे पाहिलं.

" वा ! छान ! " फौजदारसाहेब जराशा कुचेष्टेनं म्हणाले, " थोडक्यांत म्हणजे, तुमची ही ' सुंदरी ' राणीच्या बागेची छोटीशी आवृत्तीच आहे म्हणाना ! त्यांत कुठला प्राणी किंवा कुठलं फुलझाड नाही ? हत्ती आहे, सिंह आहे... "

पण त्याचे पुढील शब्द त्याच्या तोंडातच राहिले आपल्या कवीच्या हळव्या हृदयाला त्याचे हे शब्द घरे पाडीत आहेत, असं सदू आपल्या चेहऱ्यान त्याना दाखवीत होता.

" हं. मग काय विचार ठरला तुमचा ? " थोड्या वेळान जावयास उठता उठता फौजदारसाहेब म्हणाले, " पन्नास कोटीच भाण्डवल आहे.पॉलिसी-होल्डर्सना . "

" पाहू परत या उद्या. तोपर्यंत विचार करून सांगतों " त्याना वाटेला लावून देताना सदून उत्तर दिलं होतं.

खिडकीत उभा राहून ह्या प्रसंगातील शब्दन् शब्द सदून पुन्हा आठवून पाहिला सा-या खोलीवरून पुन्हा एकदा नजर फिरवून पाहिली छे ! कवीची बतावणी करण्यात त्याची काहीच चूक झाली नव्हती. फौजदारसाहेबाच्या साऱ्या शंकाच निरसन करून त्यान त्याना पुरतं बनवलं होतं आता फक्त अंधार पडण्याचाच अवकाश होता. मग तो आणि चांदगावचा तो पूल ! –

पण तो असा निर्धास्त असताना थोड्याच वेळात त्याच्या खोलीचा दरवाजा मघाप्रमाणेच ठोठावला गेला. त्यान दार उघडून पाहिलं तर खाकी गणवेषातील फौजदारसाहेब समोर उभे ! आणि ह्यावेळी ते एकटेच नव्हते, तर त्याच्याबरोबर चार सशस्त्र पोलिस शिपाईहि होते !

क्षणार्धात सारा प्रकार त्याच्या लक्षात आला, पण फौजदारसाहेबांना आपण बनवलेलं आहे, ह्या कल्पनेनं तो गाफिल असल्यामुळे प्रतिकाराची त्यानं काहीच तयारी केलेली नव्हती. मुकाट्यान पोलिसाच्या स्वाधीन होण्याखेरीज त्याला गत्यंतर नव्हतं. त्याच्या बतावणीत कुठंतरी चूक झाली होती खास !

" तुम्हाला मी अटक केली आहे ! " फौजदारसाहेब म्हणाले.

" मला अटक ! ती कां ? " सदूनं उगाच शेवटचा प्रयत्न म्हणून विचारलं.

" वाङमयचौर्याबद्दल ! "

" वाङमयचौर्याबद्दल अटक ? " सदू आश्चर्यानं म्हणाला, " आणि असं कुणाच वाङमयचौर्य केलं मी ? "

" कवि ' दिनकरानुजांचं '! मघा तुम्ही वाचून दाखविलेली ' सुदरीस '-ही कविता त्या कवीच्या कवितेची चोरी आहे ! "

" बर. कबूल पण वाङमयचौर्य हा कांही फौजदारी गुन्हा होऊं शकत नाही ! "

" खर आहे. " फौजदारसाहेब हसत म्हणाले, " पण तेवढ्यावरून तुम्ही खरे कवि नसून कवीच सोंग आणलं आहे, येवढं दिसून आलं ह्या बाबतीत आणखी दुसराहि बारीकसारीक पुरावा आहे माझ्याजवळ-चला,सदोबा सोमण, आपले हात पुढं करा मी आपणाला चतुर्भुज करतो. "

चावडीकडे जाता जाता आपला सारा डाव हुकलेला पाहून सदूला वाईट वाटल पण तशाहि स्थितीत त्याला राहून राहून एकाच गोष्टीचं आश्चर्य वाटत होत. आणि ते म्हणजे, फौजदारसाहेबांसारख्या अरसिक आडदाड माणसान आपल वाङमयचौर्य हुडकून काढाव,येवढच नव्हे तर ' दिनकरानुजा '-सारख्या कोपऱ्यांतल्या कवीच्या काव्याचीदेखील त्याला माहिती असावी ! वाङमयचौर्य करण्याच्या बाबतीत ' दिनकरानुज ' त्याला अगदी बिनधोक वाटला होता. रद्दी मासिकांतून पांचसहा वर्षापूर्वी त्याच्या एकदोनच कविता प्रसिद्ध झाल्या होत्या आणि मग नंतर तो कुठं तरी गडप झाला होता. अस असतांना फौजदारसाहेबांना त्याच्या एका भिकार कवितेची अजून आठवण रहावी, ही गोष्ट त्याची मति गुग करून टाकणारी होती. अखेरीस न राहवून त्यान फौजदारसाहेबाना विचारलंच, " तुमचा काव्याचा व्यासंग बराच दिसतोय् ? "

" छट्. मुळीच नाही ! " फौजदारसाहेब हसून म्हणाले.

" नाही ? मग ती कविता चोरलेली आहे, येवढंच नव्हे तर ती ' दिन-करानुजां 'ची आहे, येवढं सारं तुम्ही कसं बिनचूक ओळखू शकला ? "

" हे पहा श्रीयुत सोमण, " हसत हसत फौजदारसाहेब म्हणाले, " प्रत्येक माणसाच्या आयुष्यात एक काळ असा येतो की इतर काही पापांबरोबर कविता करण्याचं पापहि त्याच्या हातून घडून जातं ! "

" म्हणजे काय, तुम्हीहि एके काळी कविता केलेल्या आहेत ?" सद्‌ तर आश्चर्यानं सर्दच झाला होता. त्या फौजदाराच्या आडदांड निबर शरीरांत कधी काळी कवीच हळवं हृदय राहू शकलं असेल, ह्या कल्पनेवर त्याचा विश्वासच बसेना.

" होय हे पाप मी कधी केलं असेल, हे आता कुणाला सांगूनदेखील खरं वाटत नाही. बरं झालं, टोपण नांवानं कविता प्रसिद्ध करण्याची तेव्हा मला बुद्धि झाली ते. अहो, कवि ' दिनकरानुज ' तो मीच ! दुर्दैव तुमचं ! "



# सुखी जोडपं !

शेवंती चांगली तरणीताठी होती. असेल वीसबावीस वर्षांची. नाका-डोळ्यानी ती नीटस होती तिचा बाधा डोळ्यात भरण्यासारखा होता. स्वभावान ती सालस होती. नवऱ्यापासून तिला एक मुलगाहि झाला होता. तरीपण तिच्या नवऱ्यान तिला सोडून दिली होती. आणि तो आता थोडी पुजी बाळगून असलेल्या एका वयस्क स्त्रीबरोबर रहात होता. ह्या ' बहुजन समाजा-' तील नवरे आपल्या बायकाना का सोडून देतात, हे [illegible] मध्यम-वर्गीयांना एक न उलगडणारं कोडंच असत ! पण ते असो. आपणाला त्याच्याशी कांही कर्तव्य नाही.

नवऱ्यानं सोडून दिल्यावर आपल्या मुलाला घेऊन शेवंती एका चाळीत एक छोटीशी खोली भाड्यान घेऊन राहू लागली. आपल व मुलाचं पोट भरण्याकरता ती तीनचार ठिकाणी मोलकरणीची कामं करी.

शहाणेवकीलाकडे ती अलिकडेच कामाला लागली होती. शहाणे-वकीलाकडे एकूण माणस दोनच एक ते स्वतः व त्याच कुटुब. शहाणेवकील सव्वीससत्तावीस वर्षाचे तरुण होते. त्याचं लग्न होऊन दोनतीन वर्षंच झाली होती. मजुळा– त्यांची बायको–दिसायला चागली सुदर, गृहकृत्यात हुषार आणि शिकलेलीहि होती. तिला साजेसेच शहाणेवकीलहि होते. रगानं गोरे, अंगानं सडपातळ, तोंडावर तरतरी आणि सदा हंसतमुख. लोक म्हणत, ' जोडा कसा लक्ष्मीनारायणासारखा दिसतो ! '

तें छोटंस कुटुब अगदी सुखात होतं. घरांत मुलांची उणीव होती, पण लवकरच तीहि दूर होणार होती. वकीलसाहेबांचं मंजुळेवर प्रेम होतं, हें त्यांच्या

सर्व कृत्यांवरून स्पष्ट दिसून येत होतं. ते तिच्याकरतां वेण्या आणत, पातळं आणत. नुकतीच त्यांनी तिच्याकरता एक बाजाची पेटीहि आणली होती. ती जें काय मागेल ते ते तिला आणून देत. तिच्याशी नेहमी प्रेमळपणानं बोलत. तिला कधी शब्दानंहि दुखवीत नसत. तिची थट्टा कधी केलीच, तर तीहि अगदी हळुवारपणानं करीत. तिच्या सहवासात त्याच्या मुद्रेवर नेहमी प्रसन्नताच असे.

अर्थात् मंजुळेचहि त्याच्यावर प्रेम होतच. इतक्या प्रेमळ, लाघवी आणि आज्ञाधारक नवऱ्यावर कुठली बायको प्रेम करणार नाही ? त्या जोडप्याकडे पाहिलं की, शेवतीला भितीतल्या एखाद्या भोकात बसून घू ऽ ऽ घू ऽऽ घुमणाऱ्या पारव्याच्या जोडीची आठवण होई, आणि आपल्या ससाराचे धिडवडे आठवून तिच्या तोडातून सुस्कारा बाहेर पडे. पण त्याच सुख पाहून तिला त्याचा मत्सर वाटत नसे. ते असेच सुखात राहोत, असच ती मनात म्हणे.

मंजुळा शेवतीला फार चांगल वागवी तिच्या अडीअडचणीला ती मदत करी काही गोड केलं तर आठवणीनं ती शेवतीच्या मुलाकरता म्हणून त्यातलं थोड देई.शहाणेवकीलहि सज्जन होते. शेवतीकडे ते मान वर करूनदेखील पहात नसत, मग वाकड्या डोळ्यानं पाहाण्याची गोष्ट तर दूरच. इतर कामांच्या ठिकाणी शेवतीला पुरुषाचा जो अनुभव आला होता, त्याच्या पार्श्वभूमीवर तर शहाणेवकीलाच हे सभ्य वर्तन चागलच उठून दिसे. वकीलसाहेबाविषयी तिच्या मनात आदर होता.

दिवसामागून दिवस जात होते शेवती आपलं एकाकी आयुष्य कठत होती. तिच्या मुलाचाच तेवढा तिला विरगुळा होता. रात्रीची ती मुलाला पोटाशी घेऊन झोपे. रात्रीची तिला केव्हा केव्हा स्वप्न पडत आणि तिच्या मुखावर हसू उभ राही. शहाणेवकील—तो उमदा तरुण—तिच्या स्वप्नात आलेले असत, आणि तिच्याशी प्रेमचेष्टा करीत. तिच्यासारख्या तरण्याताठ्या आणि नवऱ्यान सोडलेल्या स्त्रीवर कोणा पुरुषाचा डोळा नसता, तरच नवल. त्यातले काही तिला खुणावीत, काही तिच्याशी थोडाफार लघळपणाहि करीत. परंतु तिन कोणालाच दाद दिली नव्हती. आपण ह्या लोकांकरता नाही असा अस्पष्टसा विचार त्यावेळी तिच्या मनाला चाटून जाई आणि शहाणेवकीलाची तरणीबाड गोरीगोमटी आकृति तिच्या डोळ्यांसमोर उभी राही.

वकीलसाहेब आपणाला अप्राप्य आहेत, हें तिला कळत होतं. आपल्या मनांत त्यांच्याविषयी आदराखेरीज दुसरी कुठलीहि भावना आहे,असं तिनं कधी आपल्या वर्तनावरून दाखवलं नाही. पण ती हळूच त्याच्याकडे चोरून पाही. ते कागदात डोक खुपसून बसलेले असले की, ते दिसतील अशा जागी ती उभी राहून त्याना डोळे भरून पाहून घेई. तिच मन मग कुठल्यातरी स्वप्नरंजनात रमून जाई.

मजुळेला दिवस भरत आले. बाळतपणाकरता ती थोडयाच दिवसांत माहेरी निघून गेली. आता शहाणेवकील एकटेच घरी होते.

जाण्यापूर्वी मजुळा शेवतीला म्हणाली, " शेवती, रोज सकाळची येऊन पहिल्यान बब पेटव. मग झाडलोट करून, साहेबांची आघोळ झाली की कपड धुवून घरी जात जा. "

शेवतीनं ' होय ' म्हटल होत.

मंजुळा माहेरी गेल्यावर वकीलसाहेब रोज सकाळी उठून स्वत.च चहा करून घेत मग आपल्या कामात डोक खुपसून बसत. तोपर्यंत शेवती येऊन तिन बब पेटवलेला असे. मग ते आघोळ करून घेत. शेवतीचं कपडे धुण होईपर्यंत ते आपल काम सपवीत आणि मग कोर्टाचा जामानिमा करूनच खाणावळीत जेवावयास जात.

शेवती रोज कामाला येत होती. ती खाली मान घालून काम करीत असे. एखाद दुसऱ्या वेळीच तेवढं ती कामात व्यग्र असलेल्या वकीलसाहेबाकडे चोरून पाहून घेत असे आणि मग खाली मान घालून घरी जात असे.

शेवंती काम करत असताना वकीलसाहेब कामांत डोक खुपसून बसत. निदान पहिले काही दिवस तरी ते तसे बसत. नतर मग ते घराची झाडझूड करणाऱ्या शेवंतीकडे एकदोनदा चोरून पाहून घेत; आणि पुन्हा आपल्या कामांत व्यग्र होत.

एक दिवस त्यानी शेवंतीकडे तसं चोरून पाहायला आणि शेवतीनहि त्यांच्याकडे तसंच चोरून पाहायला एकच गाठ पडली. दोघहि लाजली आणि क्षणभर गोंधळून दोघहि आपल्या कामांत व्यग्र झाली.

दोनतीन दिवसानी वकीलसाहेब शेवंतीला म्हणाले—अर्थात् खालीं पहातच— " शेवती, आज संध्याकाळी जरा येऊन जा थोड काम आहे. "

खाली मान घालून शेवती म्हणाली, " होय. "

जे इतके दिवस शेवन्तीच्या स्वप्नात दिसत होतं, जे मिळणं केवळ अशक्य आहे अस तिला वाटत होत, ते तिला त्या सध्याकाळी मिळाल. ती परत जावयाला निघाली तेव्हा किंचित् शरमिद्या स्वरात वकीलसाहेब खाली पहात म्हणाले, " शेवंती, पण हें कुणाला कळू देऊ नकोस हं ! "

" नाही ! " हंसून शेवंती म्हणाली, " मला येवढं का कळत नाही ? "

तिच्या हृदयातल हे गोड रहस्य तिला जगापासून लपवूनच ठेवायचं होतं.

त्यानंतर शेवंती वकीलसाहेबाकडे ' कामा ' ला वरचेवर येऊं लागली. कधी ती त्याना काही खाद्यपदार्थ करून आणी. अलिकडे सकाळ संध्याकाळ चहाहि तीच बनवू लागली होती. वकीलसाहेब इतके दिवस संध्याकाळचे नियमितपणान क्लबात जात. आता त्याची नियमितपणान क्लबात गैरहजेरी लागू लागली.

वकीलसाहेब एक दिवसाआड मजुळेला पत्र लिहीत त्यात तिचा विरह आपणाला कसा असह्य होत आहे, तिची आपणाला क्षणाक्षणाला कशी आठवण होत आहे, काल रात्रीच स्वप्नात ती कशी आली होती, वगैरे गोष्टी लिहीत. मजुळेचीहि प्रेमानं ओथबलेली, आणि ती नसल्यामुळे वकीलसाहेबाची किती गैरसोय होत असेल ह्याविषयी काळजी व्यक्त करणारी पत्र वकीलसाहेबाना नियमित येत.

वकीलसाहेब शेवतीला पैसे देत. ती ' नको नको ' म्हणत असता ते तिच्या हातावर बळेच पैसे ठेवत. एक दिवस त्याना तिच्याविषयी काय वाटलं, कोणास ठाऊक ! समोरच खुटीवर मजुळेन आपल्या काचेच्या ताबड्या बागड्या अडकवून ठेवल्या होत्या. त्या त्यानी पटकन् काढल्या आणि शेवतीचा लुसलुशीत हात हातात धरून, ते त्या बागड्या तिच्या हातात चढवण्याचा प्रयत्न करूं लागले.

शेवतीन वात्रटपणान हात मुद्दामच आकुंचित केला नाही. वकीलसाहेब तिचा हात दाबून दाबून बागडी वर सरकवण्याचा प्रयत्न करत होते. तो त्यांचा प्रयत्न विफल होत असलेला पाहून शेवतीला मोठीच गंमत वाटत होती;

आणि ती खुदखुदून हसत होती. वकीलसाहेबांनी हात दाबला की तिच्या हृदयाला गुदगुल्या होत.

अखेरीस आपणाला हे काम जमत नाही असं पाहून वकीलसाहेब म्हणाले, " हात जरा बारीक कर ना ! "

" नको ! " एकदम किंचित् गंभीर होऊन शेवंती म्हणाली, " बाई-साहेबांच्या आहेत ना त्या ? "

" असू दे ! तिला काय कळणार आहे ते ! " वकीलसाहेब म्हणाले.

मग शेवंतीन बागड्या आपल्या हातात घेतल्या आणि सटकन् आपल्या हातांत चढवल्या.

" शेवती ! " ती जावयास निघाल्यावर वकीलसाहेब केविलवाणा चेहरा करून म्हणाले, " आपलं हे कोणाला साग् नकोस हं ! नाही तर माझी अब्र् जाईल आणि मजुळेला कळल तर तिला किती दु:ख होईल ! आमच्या संसारातलं सारं मुख नाहीसं होईल ! "

" मला काय तुम्ही वेडी समजता का ? " शेवती म्हणाली, " आणि मलाहि नाही का लोकं नांव ठेवणार ? "

आतापर्यंत वकीलसाहेबानी तिला हे शंभरदा तरी सागितल असेल. त्यावर तिन अस काही आश्वासन दिल की मग त्यांचा जीव खाली पडे.

थोड्या दिवसानी आपल्या बाळाला घेऊन मजुळा घरी आली. आपल्या वशवेलीवर उमललेल ते कोवळ, लालसर, निष्पाप फूल पाहून वकीलसाहेबाच हृदय वात्सल्यान आणि अभिमानान भरून आल.

त्याचा ससार पूर्वीप्रमाणेच आनदांत सुरू झाला म्हटलच तर उलट आता त्याचा आनद वाढलाच होता.आता त्याच्या सुखात कसलीच कमतरता नव्हती. लोक म्हणत, " किती सुखी जोडपं ! "

शेवती रोज कामाला येत होती.बाळाच कौतुक करत होती.काम करता-करतां मध्येच कधी चोरून वकीलसाहेबांकडे पाहात होती

पण वकीलसाहेब मात्र आता तिच्याकडे पाहात नव्हते. मंजुळा आणि शेवंती ह्यांची तुलना त्यांच्या मनांत येई, आणि मग आपणांला मंजुळेसारखी येवढी सुदर, सुशील आणि सद्‌गुणी बायको मिळाली असतांनादेखील आपण

शेवंतीवर कसे भाळलो, ह्याचं त्यांना नवल वाटे. मजुळेच्या सहवासांत असल्यावर त्याना शेवतीकडे ढुकूनहि पाहावस वाटत नव्हत. त्यातून आपण तसं एखादेवेळ पाहिलं आणि आपल सारंच बिग फुटल तर! अशीहि भीति त्याच्या मनात सतत होती. म्हणून ते तिच्याकडे चुकूनसुद्धा पाहात नसत.

बायकाची स्मरणशक्ति आणि दृष्टि मोठी तीक्ष्ण असते. एक दिवस मंजुळेन वकीलसाहेबाना विचारल, “ माझ्या त्या काचेच्या तांबड्या बागड्या कुठ आहेत ? ”

“ अं ? ” गोधळून वकीलसाहेब उद्‌गारले मग जणू काय त्या बांगड्या आपण जन्मांत कधी पाहिल्याच नव्हत्या अशा आविर्भावाने त्यानी विचारलं, “ कुठल्या ? ”

“ ह्या खुटीवर ठेवल्या होत्या मी त्या लीलाबाईनी हळदीकुंकवाला दिल्या होत्या. ”

“ मग नाहीत का त्या खुटीवर ? ” सगळ्या खुट्यावरून नजर फिरवीत वकीलसाहेबानी विचारल.

“ नाहीत ना ! ”

“ असतील कुठं तरी ! ” वकीलसाहेबानी उडवाउडवीच उत्तर दिलं. मजुळेनहि मग त्या प्रश्नाचा अधिक पिच्छा पुरवला नाही

शेवंती रोज काम करताना वकीलसाहेबाकडे चोरून पाहात होती. वकीलसाहेब एकदा तरी आपणाकडे पाहून हसतील अशी तिला आशा वाटे. ते नुसते हसले असते तरी ती खूष झाली असती परतु वकीलसाहेबानी आपल धोरण ठरवून टाकलं होतं आणि त्याच ते अगदी कसोशीनं पालन करीत होते. तरी पण शेवती त्याच्याकडे एकदोनदा तरी डोळे भरून पाहून घेतच होती. त्याच्याकडे पाहात असताना तिला मजुळा माहेरी गेलेले दिवस आठवत आणि त्या सुखाच्या आठवणीनीदेखील तिला सुख होई.

शेवती वकीलसाहेबाकडे अशी चोरून पाहात असताना मजुळेन एकदोनदा पाहिलं. मंजुळेला तिची ही वागणूक जरा विचित्र वाटली. ती एक दिवस वकीलसाहेबाना म्हणाली, “ शेवंती अलिकडे अशी काय वागते कोण जाणे ! ”

“ कां ? ” वकीलसाहेबानी दचकून विचारलं.

“ काम करतांना मध्येच ती थाबते आणि तुमच्याकडे पाहात राहाते. ”

" छट् ! माझ्या कधी नाही कसं लक्षात आल ते ? "

" तुम्ही आपले कामात गढलेले असता. पण एकदोनदा तिला मी तसं पाहिल आहे. तिची समजूत असेल, आपणाला कोणी पाहात नाही म्हणून ! "

" छे ! तुझा काहीतरी गैरसमज झालेला दिसतो ! "

" तशीच माझ्याकडेहि मधून मधून चोरून पाहाते. माझ तिच्याकडे लक्ष नाही ना, अशी जणू काय तिला खात्री करून घ्यायची असते ! "

" असं ? " शेवंतीच्या ह्या विचित्र वागणूकीचा आपणाला काहीच अर्थबोध होत नाही, अस दाखविणारा चेहरा करून वकीलसाहेबानी विचारलं.

" मला एक शका येते ! " मंजुळा म्हणाली.

" काय ? " चितेच्या स्वरात वकीलसाहेबानी विचारल.

" तिला काही तरी चोरायच असेल ! " मजुळेच उत्तर ऐकून वकील-साहेबाचा जीव खाली पडला. ते भाबडेपणाचा आव आणून म्हणाले, " छे! ती तर इतके दिवस आपल्याकडे कामाला आहे. मग कधी तसं दिसून आल नाही ते ? "

" बारीकसारीक वस्तु चोरल्याहि असतील तिन ! आपण कुठं एवढं लक्ष ठेवतो ? माझ्या त्या ताबडचा बागडया — त्या नाही का नाहीशा झाल्या ? "

वकीलसाहेबानी काहीच उत्तर दिल नाही जणू हा विषय आपणांला मुळीच महत्त्वाचा वाटत नाही, असं दाखवून त्यानी आपल्या कामात डोकं खुप-सलं. अर्थातच, त्याना पाहिजे होत त्याप्रमाणे हा विषय तिथंच थाबला.

दोनतीन दिवसानी बाळाला घेऊन मजुळा देवीच्या दर्शनाला गेली. तिथं तिला शेवती भेटली.

मजुळेन बाळाला तिच्याकडे दिल. पण त्याच वेळी तिला शेवतीच्या हातातील काचेच्या ताबडचा बागडचा दिसल्या.

आपल्याच का ह्या बागडचा ? तिच्या मनात एकदम शका आली. तिनं निरखून पाहिल तिला त्या चांगल्या ओळखीच्या वाटल्या. तेच डिझाईन—तोच गर्द ताबडा रग —

घरी आल्यावर ती वकीलसाहेबाना म्हणाली, " अखेर माझाच संशय खरा ठरला ! "

" काय ? "

" शेवंती चोरटी आहे माझ्या बांगड्या तिनंच चोरल्या ! "

" अस ? "

" आज देवळात पाहिल्या ती हातांत घालून आली होती. "

" हं ! " काळजीच्या स्वरात वकीलसाहेब उद्गारले. मंजुळेला वाटलं, आपली मोलकरीण चोरटी आहे, ह्या विचारामुळेच वकीलसाहेबांना आपल्या मालमत्तेविषयी वगैरे काळजी वाटत असावी.

दुसऱ्या दिवशी सकाळी नेहमीप्रमाणे शेवंती कामाला आली. काम करता करता तिन वकीलसाहेबाकडे चोरून पाहिल. आज वकीलसाहेबाचंहि तिच्याकडे लक्ष होत. त्यानी तिच्याकडे पाहताच तिनं मधुर स्मित केलं. पण वकीलसाहेबाच्या कपाळाला आठ्या पडल्या. त्यानी आपलं तोड दुसरीकडे फिरवल.

वकीलसाहेब अलीकडे जरा काळजीतच होते. ' शेवतीची वागणूक मंजूळेला विचित्र वाटू लागली आहे. सध्या ती तिला चोरटी समजते. ह्यापुढ तर मजुळा तिच्यावर चागलीच पाळत ठेवणार. शेवतीन आपल्या नुसत्या बागड्याच चोरलेल्या नाहीत तर आपल सर्वस्वहि चोरल आहे, हे कदाचित् तिला कळून येईल. तशी मजुळा मोठी चाणाक्ष आहे. शेवती आपणाकडे चोरून पाहाते, आपण पाहिल तर हमते. आणि हे कधी मजुळेन पाहिल तर ? शेवतीच्या हातात तिच्या बागड्या कशा गेल्या, हे तिला कळलं तर ?....'

तर काय परिणाम होतील, ह्याची त्याना कल्पनाच करवेना आपलं असल वर्तन मजुळेला समजल तर ती काही स्वस्थ बसून राहणारी बाई नव्हती. आपल बिग मजुळेला कळल तर आपल्या साऱ्या सुखाचा, ससाराचा विचका होईल, अशी त्याना भीति वाटू लागली होती. लोक आपल बायकोवर फार प्रेम आहे अस समजतात ! पण ही भानगड जर त्याना कळली तर आपण बायकोला अस फसवीत होतो हे पाहून ते आपणाला तोड वर करूं देणार नाहीत. छे ! छे ! काय कराव ?...

मजुळा आघोळीला गेल्यावर शेवंती त्यांच्याकडे आली. वकीलसाहेबांनी तिच्याकडे जरा कठोर नजरेनच पाहिलं. ती लाडिकपणानं हसली. पण वकीलसाहेबानी न हसताच आघोळीच्या खोलीच्या दरवाजावर आपली नजर रोखून विचारलं, " काय ? "

" थोडं काम होतं ! " शेवंती म्हणाली.

" काय सांग ! " वकीलसाहेब घाईघाईत म्हणाले, " आटप लवकर ! "

" जरा पांच रुपये हवे होते. . . . "

तिच पुरतं बोलून होण्यापूर्वीच वकीलसाहेब पटकन् उठले. पैसे कशाला पाहिजेत, परत देणार की नाही, वगैरे काही न विचारता ते खुटीला टागलेल्या कोटापाशी गेले, आणि आतल्या खिशातून एक पाचाची नोट काढून त्यानी ती तिच्या हातावर ठवली.

" पगारातून कापून घ्या — " शेवंती म्हणाली.

" नको. काही जरूर नाही ! " वकीलसाहेब कुजबुजत म्हणाले, " चल, जा आता लवकर ! "

थोडचाच वेळात आघोळीच्या खोलीचं दार उघडलं, तेव्हा वकीलसाहेब आपल्या कामात गर्क होते. त्यानी एक सुटकेचा सुस्कारा टाकला.

कुंकू लावून मजुळा बाहेर आली आणि वकीलसाहेबाना म्हणाली, " मला रेशनला पैसे पाहिजेत. तुमच्या कोटात आहेत ना ? "

वकीलसाहेब म्हणाले, " माझ्या कोटात कुठ आहेत येवढे पैसे ? "

" आहेत तर ! काल रात्रीच मी पाहिल होत. एक पाचाची नोट होती आणि काही चिल्लर होती. " अस म्हणून मजुळेन खुटीला टागलेल्या त्याच्या कोटाच्या खिशात हात घातला.

वकीलसाहेबाच डोक एकदम गिरगिरू लागलं. त्या पाच रुपयाचं काय केल म्हणून आता सागणार ? त्याना काहीच सुचेना.

" अगबाई ! " खिशात हाताला नोट न लागल्यामुळे मजुळा उद्गारली, " तुम्ही खर्च करून टाकले वाटत ! काय घेतल तुम्ही ? "

" अ ? नाही ! मी नाही खर्च केले ! " अजूनहि खर्चाची सबब न सुचल्यामुळे वकीलसाहेब गोधळून म्हणाले, " तूच काढून ठेवले असतील. "

" मी घेतले नाहीत हे मला पक्कं आठवत ! "

" अस ? मग कोटातच असतील ! "

" नाहीत ना ! " पुन्हा सारे खिसे तपासून मंजुळा म्हणाली. मग तिच्या डोक्यांत काहीतरी कल्पना चमकून गेली. शेवंती घरात काम करीत होती. त्या दिशेनं तिनं पाहिलं आणि मग वकीलसाहेबांकडे एक अर्थपूर्ण कटाक्ष टाकला.

वकीलसाहेबाचा गोंधळ एकदम नाहीसा झाला आणि त्यांनी होकारार्थी मान हलवली.

" शेवंती ! ए शेवंती ! " मंजुळेनं मोठमोठ्यानं हाका मारल्या.

शेवंती लगबगीन आली आणि एका कोपऱ्यात मर्यादशीरपणानं उभी राहून म्हणाली, " काय बाईसाहेब ? "

" शेवती ! " मजुळा तिच्याकडे रोखून पाहात म्हणाली, "खरं सांग ! ह्यांच्या खिशातली पावाची नोट तू चोरलीस ना ? "

ह्या अनपेक्षित प्रश्नान शेवती गोधळून गेली. तिनं वकीलसाहेबाकडे झटकन् नजर टाकली खर काय ते तुम्हीच सागा, असा जणू त्या नजरेचा अर्थ होता. मग ती काही न बोलता खाली मान घालून उभी राहिली.

" साग ना ! " वकीलसाहेब म्हणाले.कोर्टात एखाद्या आरोपीची उलट-तपासणी करावी, तशा स्वरात ते बोलत होते. " शेवती,आम्हाला तुझाच संशय येतो. तुझ्याखेरीज इथ दुसर कोणी परक माणूस येत नाही. काल रात्रीपर्यंत माझ्या खिशात नोट होती, आणि आता पाहतो तो ती नाहीशी झाली आहे ! "

वकीलसाहेबाच हे बोलण ऐकून तर शेवतीला आश्चर्याचा धक्काच बसला. ती पार गोधळून गेली आणि तिची वाचाच बसली.

" आता का बोलत नाहीस ग ? " मजुळेन विचारल, " तुझ्यावर येवढा विश्वास टाकला, तुला एवढ चागलं केलं, त्याचे बरे पाग फेडलेस! अग चोरटे ! "

" बाईसाहेब, मी चोरले नाहीत पैसे ! " ती कशीबशी म्हणाली.

" चोरूनच्या चोरून वर पुन्हा नाकबूल करतेस ! " मजुळा रागानं म्हणाली, "तुझा आवाजच सागतोय् तू चोरी केलीस म्हणून! माझा बागडयाहि तूच चोरल्यास ! आणखी काय काय चोरलस कुणास ठाऊक ! "

, " शेवंती, उद्यापासून तू कामावर येऊं नकोस ! " वकीलसाहेब गंभीर-पणानं म्हणाले, " असले चोर नोकर नकोत आम्हाला ! "

" बोल ना! ए चोरट! आता का दातखिळ बसली ? " मंजुळा म्हणाली, " तू चोरले नाहीत ना पैसे ? मग साग ना तस ! "

शेवंतीला संताप आला. मंजुळेच्या तोंडाचा पट्टा तिला असह्य वाटू लागला होता. विशेषत: वकीलसाहेबहि आपणावर सापासारखे उलटलेले पाहून तिला त्यांच्याविषयी त्वेष वाटू लागला. जोपर्यंत तिच्याबरोबर मजा मारायची होती, तोपर्यंतच त्यांना तिची जरूर होती.

आपलं काम झाल्यावर त्यानी तिला आता झिडकारून टाकली होती. त्यांचं आपणावर प्रेम असेल, असं तिला कधीच वाटलं नव्हतं. पण खऱ्या गोष्टी ठाऊक असूनहि त्यानी आपल्यावर धडधडीत चोरीचा आरोप करावा ? आपणांला ते ओळखत का नाहीत ? आणि आता त्यानी हे असं उलटचा काळजाचं कृत्य करावं ? तिचा राग वाढत वाढत अनावर झाला. तिला वाटलं, मंजुळा यवढचा तोऱ्यात बोलत आहे, तो तिचा तोरा सार खरंखरं सागून उतरून टाकावा. आपल्या एकाच शब्दान ती जमीनदोस्त होईल. ह्या उलटचा काळजाच्या वकीलसाहेबांच सारं ढोंग उघडं पाडावं. वकीलसाहेबाकडे जळजळत्या दृष्टीन पाहात ती बोलू लागली,

" ऐका. खरं काय ते ऐकायचं आहे ना तुम्हांला ? मग ऐका. ते पैसे मी चोरले नाहीत. ते पैसे मला —तुमच्या बागडयाहि —"

पण बोलता बोलता ती एकदम थबकली. वकीलसाहेबाची मुद्रा तिला कावरीबावरी झालेली दिसली. त्याचे डोळे लाचारपणानं तिला विनवण्या करत होते.

तिचा संताप नाहीसा झाला. ती त्याच्याकडे पाहून एकदा तुच्छतेनं हंसली.मग तिला एकदम हुंदका आला. हृदय कालवलं जात असतानाच ती म्हणाली, " नाही—होय, बाईसाहेब! मी चोरले ते पैसे—तुमच्या बागडयाहि मीच चोरल्या ! "

येवढं बोलून तिनं आपलं मुख दोन्ही हातांनी झाकून घेतलं आणि ती मुसमुसून रडू लागली

चोरटचा शेवतीला नौकरीवरून ताबडतोब बडतर्फ करण्यात आल. वकीलसाहेबाच शील व अब्रू शाबत राहिली प्रतिष्ठित समाजात डोकं उंच ठेवून वावरण्याचा त्यांचा अधिकार कायम राहिला

वकीलसाहेबांच्या आणि मंजुळेच्या जोडप्याकडे पाहून लोक म्हणताल, " किती प्रेमळ जोडप ! किती सुखात आहेत दोघ ! "

● ● ●

# नवकथाकाराची हॅट

वसंताच्या वागणुकीचा आम्हाला अर्थच कळेना

वसंताला मी लहानपणापासून ओळखत होतो. वसंता हा एक सुशील, सुद्‌गुणी, विचारशील आणि घुम्या स्वभवाचा तरुण म्हणून आम्हां सर्व मित्रमंडळीत ओळखला जात होता. कधी कोणाच्या अध्यात ना मध्यात-कधी कोणाला तो कटु शब्द बोलत नसे. शिवीगाळ, एखादा असभ्य शब्द त्याच्या तोंडातून कधी चुकूनहि निसटत नसे. स्त्रियाकडे त्याने कधी वर दृष्टि करून पाहिले नव्हते. कोठलीहि स्त्री- अर्थात् त्याला ओळखणारी —त्याच्या सहवासात बिनधोकपणे वावरत असे. अशा ह्या आमच्या वसंताचे त्या दिवसाचे ते विचित्र वर्तन पाहून आम्ही दिङ्मूढ होऊन गेल्यास नवल नव्हते.

वसंता, मी, प्रभाकर व त्याची बहीण शालन असे आम्ही चौघे सुरुंगवाडीला सहलीला गेलो होतो. सुरुंगवाडी हे काही तसे विशेषसे प्रख्यात स्थळ नाही. परंतु त्याच्याजवळच एक साधारण मोठासा धबधबा आहे तो पाहण्याकरता थोडेफार हौशी लोक मधून मधून येत असतात. अर्थात् गोकाकचा किंवा गिरसप्पाचा धबधबा ज्यांनी पाहिलेला आहे, त्यांना सुरुंगवाडीच्या धबधब्यात विशेषसे पाहण्यासारखे काहीच नाही. सुरुंगवाडीचा धबधबा पाहण्यास आम्ही जे गेलो त्यात तेथील धबधबा पाहण्याच्या इच्छेपेक्षा आमचे इतरच उद्देश अधिक प्रभावी होते. आम्हाला दोनच दिवसांची रजा होती. येवढ्या अवधीत आम्हांला अधिक लांबची सफर काढणे शक्य नव्हते. सुरुंगवाडीला माझा आतेभाऊ डॉक्टर होता. त्याच्याकडे राहण्याची व जेवण्याखाण्याची उत्तमपैकी सोय होण्यासारखी होती.

दोन दिवस जरा हवाफेर व नेहमीच्या दगदगीतून विश्राति येवढाच आमचा ही ' ट्रिप ' काढण्यात उद्देश होता.

शालनचा मी दूरचा भाऊ होतो प्रभाकर तर तिचा सख्खाच भाऊ होता. वसंतलाहि ती ओळखत होती. त्याचे सभ्य, सुसंस्कृत वागणे तिच्या चागलेच परिचयाचे होतें त्यामुळे आम्हा तिघा पुरुषाबरोबर ट्रिपला येण्यात तिला संकोच वाटण्याचे काहीच कारण नव्हते.

सुरुगवाडीपर्यन्तचा आगगाडी नि बसचा पाचसहा तासाचा प्रवास आम्ही चागलाच हसतखेळत केला, आणि सध्याकाळच्या सुमारास आम्ही सुरुंगवाडीला डॉक्टराच्या घरी जाऊन पोहोचलो. अर्थात् अवखळपणा करण्याचा मक्ता प्रभाकरकडेच होता. मी आणि शालनहि अधूनमधून विनोद करीत असू. वसता मात्र क्वचितच एखादा शब्द बोले. आमच्या थट्टामस्करीवर तो किंचित् हसे, तेहि क्वचितच. तो स्वतः जरी बोलत नसला आणि फारसा हसत नसला तरी प्रवासाची मौज आमच्याइतक्याच हौशीने तोहि लुटीत होता, हे मात्र स्पष्ट दिसत होते.

रात्रीचा मुक्काम आम्ही डॉक्टराकडेच केला. प्रवासाचा शीण झालेला असल्यामुळे आणि सकाळी लवकर उठून धबधबा पाहावयास जावयाचे असल्यामळे आम्ही रात्री लवकरच झोपी गेलो. आम्ही जो धबधबा पहावयास जाणार होतों, त्याचे नाव जरी ' सुरुंगवाडीचा धबधबा ' असे असले तरी तो सुरुगवाडीपासून चांगलाच आठदहा मैल लांब आहे. तेथे जाण्याकरता चागलासा रस्ताहि नाही तेव्हा उन्हाचा विशेषसा त्रास होऊं नये म्हणून भल्या पहाटेस निघणेच अधिक सोयीस्कर होतें.

दुसऱ्या दिवशी पहाटे आम्ही चारालाच उठलों. सुरुंगवाडीला वीज नव्हती. एक मिणमिणती चिमणी लावून आम्ही आमचे कार्यक्रम उरकून घेत होतो शहरी जीवनातून खेड्यांतील स्वच्छ, शात, निर्मळ वातावरणात आल्यामुळे आणि सारा दिवस स्वच्छंदाने घालवावयाचा आहे या कल्पनेमुळे आम्हां सर्वांना उत्साह वाटत होता. त्या उत्साहाच्या भरांत प्रभाकरने भिंतीवर विजेचे बटन दाबल्यासारखे करून, " अरेच्या ! वीज गेली वाटतं ! " म्हणून विनोद केलाच, व आम्हीहि त्याच्या ह्या पोरकट विनोदाला

पोरकटपणानं पोट धरून हसलों. वसंताच्या तोंडावरदेखील एक स्मिताची रेषा उमटलेली आम्हांला दिसून आली.

पाण्याची पिशवी, कॅमेरे, जेवणाचा डबा वगैरे सर्व सामुग्री घेऊन आम्ही धबधब्याकडे निघण्याकरता सज्ज झालो. तेवढ्यांत आमच्या गडबडीने डॉक्टरहि जागे झाले होते, ते आमच्याकडे येऊन म्हणाले, " दुपारचं ऊन मोठं कडक पडतं, तरी छत्र्या हॅटी वगैरे घेऊन जा ! "

" त्याचा सारा बदोबस्त आम्ही करून ठेवला आहे ! " मी म्हणालों. सुरुंगवाडीच्या धबधब्याच्या एका सफरीकरता आफ्रिकेच्या अरण्यांतील यात्रे-करता करावी तेवढी तयारी करून आम्ही आलेलो होतो.

" बरं तर मडळी, चहा तयार आहे. चहा घेऊन लवकरच निघा. म्हणजे उन्हाचा त्रास व्हायचा नाही. नाहीतर इथल्या उन्हामुळे सन्स्ट्रोक होण्याची फार भीति असते! " डॉक्टर म्हणाले.

उन्हाच्या भीतीने शालनने आपली बायकी छत्री आणलेली होती. आम्ही पुरुषानी हॅटस् आणलेल्या होत्या. वसता सहसा हॅट वापरीत नसे. ऐन वेळेवर त्याच्या डोक्याला बरोबर बसणारी कोणाची हॅट न मिळाल्यामुळे त्यान आपली एक जुनीच दोनतीन वर्षात न वापरलेली हॅट आणली होती. तिचे कापड एक-दोन ठिकाणी फाटलेले होते. वरच्या एकदोन पट्ट्या गायब झालेल्या होत्या व तिच्यावर पिवळट रंगाचे नकाशेहि उत्पन्न झालेले होते. " काम चालेल हिच्या-वर ! नाही तरी सुरुंगवाडीच्या जगलात कोण पाहायला येणार आहे माझी हॅट म्हणा ! " असे किंचित् ओशाळलेल्या स्वरांत म्हणून वसताने मोठ्या नाईलाजाने ती जुनी हॅट आपल्याबरोबर घेतलेली होती.

डॉक्टराबरोबर हसत खिदळत आमचा नास्ता झाला. मग आम्ही पुन्हा आमचें सामान असलेल्या खालीत गेलो. खोलीतील चिमणी विझलेली होती. अदाजानेच आम्ही आमचे सामान उचलून घेतले आणि डॉक्टरांचा निरोप घेऊन बाहेर पडलो.

बाहेरहि अजून किंचित् अंधारच होता. एखाद्या घरांतून जात्याची घरघर आणि ओव्याचे शब्द कानांवर येऊन पडत होते. कुठे झापेतून जागे झालेल्या बैलांच्या गळ्यांतील घंटांची किणकिण कानांवर येऊन पडत होती. सुरुंग-वाडीचें खेडे आस्तेआस्ते एका नव्या दिवसाला सुरवात करीत होतें.

थोड्याच वेळांत आम्ही गावांतून बाहेर पडलों. अद्याप सूर्य उगवला-देखील नव्हता, मग ऊनाची गोष्ट कशाला ? तरी वसंता डोक्यावर हॅट घालून चालत होता. त्याची थोडीशी गंमत करावी म्हणून मी त्याच्याजवळ गेलों आणि म्हणालो, " वसंता, भारीच ऊन पडलंय् नाही ? "

" ऊन ? ऊन कसचं आलंय् ? आकाशाचं नाक चोंदलय् आणि दूर पलीकडे क्षितिज विवळतंय् ! " वसंता उद्गारला. त्याचे हे उद्गार ऐकून आणि त्याच्या डोळ्यांत खेळणारी एक विचित्रच चमक पाहून मी जरा चमकलोच. पण मला वाटले, वसंता विनोद करीत असावा. प्रभाकरच्या विनोदाचा संसर्ग त्यालाहि झाला असावा.म्हणून मी त्याच्या 'विनोदा' ला हसलों आणि म्हणालों, " आता काढ की ती हॅट ! निव्वळ शिमग्यांतलं सोंग दिसतोस ! "

" माझ्या मनांत अर्थशून्य वादळे निर्माण होत आहेत ! सुरेल रात्रीच्या स्वप्नाचा हिरवापिवळा द्रव काळी माजरी चाटीत आहे–" बोलता बोलता वसंताने डोक्यावरची हॅट काढली आणि त्याचे ते वाक्य तेवढ्यांतच तुटले. त्याचे डोळे पूर्ववत शांत गंभीर दिस् लागले. मग आपण क्षणापूर्वी कांहीतरी विचित्र अर्थशून्य बोलत होतो हे जणू विसरूनच, हॅटचें निरीक्षण करीत तो नेहमीच्या स्वरांत म्हणाला, " ही हॅट विचित्रच दिसतेय् ! निघतांना डोक्यांत घालून पाहिली होती, तेव्हा बरोबर होत होती नि आता पहातों तो डोक्याला जरा घट्टच होते ! एका रात्रीत ही हॅट एवढी आकुंचन पावावी,ही जरा आश्चर्याचीच गोष्ट आहे ! "

खरे होतें त्याचे म्हणणें. त्याच्या डोक्यावर ती हॅट नुसती वरवर ठेवल्या-सारखी मघा दिसत होती. जरासादेखील वारा लागला तरी ती त्याच्या डोक्या-वरून उडून जाईल असें तिच्याकडे पाहतांना वाटत असें.

" कांहीका असेना ! " वसंता म्हणाला, " आजचं काम भागलं म्हणजे पुरे ! सनस्ट्रोक होण्यापेक्षा असली हॅट वापरलेली बरी ! उद्या घरी गेल्यावर तुकडे तुकडे करून बंबांत घालून देतों हिला ! " वसंता म्हणाला.

प्रभाकर आणि शालन आमच्या जरा पुढून चालत होते. मी वसंताबरोबर चालत होतों. आमच्या रस्त्याच्या दोन्ही बाजूना हिरवीगार शेतें होती. मधून मधून आम्हांला मोठमोठे वृक्ष लागत. त्या वृक्षांवर पाखरांचा एकच किलबिलाट चालू असे. जणू त्यांच्या नगरपालिकेच्या सभाच चालू होत्या !

थोडा वेळ आम्ही दोघे कांही न बोलतां चालत होतों. पण माझ्या मनांत मात्र मघा वसंताने उच्चारलेल्या त्या विचित्र वाक्याविषयी कुतुहल उत्पन्न झालें होते. अखेरीस न राहवून मी त्याला विचारले, " वसंता, मघा तू काय म्हणत होतास ? "

" कुठं काय ? "

" आकाशाचं नाक चोंदलंय् – आणि क्षितिज विवळतंय् ! आणि कसलासा द्रव – "

" छट् ! उगाच कांहीतरी काय आरोप करतोस माझ्यावर ? " वसंता किंचित् आश्चर्याने म्हणाला, " असं कशाला मी बोलेन ? आकाशाला कुठे नाक असतं ? आणि क्षितिज विवळेल कशाला ? "

" तू तस म्हटलस खरं ! " मी म्हणालों.

" मला तरी काही आठवत नाही ! " वसंता म्हणाला. तो विषय आम्ही तिथेच सोडून दिला आणि जरा झपझप चालत प्रभाकरशालनला गाठलं. प्रभाकर तर एखाद्या लहान मुलाप्रमाणे हसत खिदळत होता.मध्येच एखादी गाण्याची लकेर हवेवर सोडून देत होता. बुटांनी रस्त्यावरची ढेकळं दूर उडवून देत होता· आजूबाजूच्या सृष्टिसौदर्याचे प्राशन करीत शालनहि संतुष्ट वृत्तीने चालत होती.

हास्यविनोदांत वेळ एवढा भरभर जात होता आणि सृष्टिसौदर्य पाहून निरागस आनंदाचा आम्हाला एवढा कैफ चढलेला होता की, ऊन केव्हा पडले, आम्ही आमच्या डोक्यांवर आमच्या हॅटस् केव्हा चढवल्या आणि शालनने आपली इवलीशी छत्री केव्हा उघडली, हेदेखील आम्हांला कळून आले नाही. आता उष्माहि बराच जाणवू लागला होता. सकाळच्या थंडीकरता आम्ही स्वेटर्स घातले होते. ते हळूहळू अंगांतून काढणे आम्हांला भाग पडले. थोड्याच वेळात ऊन चांगले रखरखू लागलें.

" आकाशांतून मेघ लोंबतो आहे ! प्रभाकर हा एक लिवलिवणारा डोंगळा आहे आणि शालन ही एक वळवळणारं कोकरूं आहे ! — मी प्रामाणिक–पणानं चालतों आहे. प्रामाणिकपणान मी कपडे घातले आहेत! माझी हॅटहि मी प्रामाणिकपणानं डोक्यावर ठेवलेली आहे ! गोठलेल्या भविष्यकाळाचें बर्फ

तोंडांत टाकून तुम्ही मिटक्या काय मारतां ? मी शूर आहें. मी प्रामाणिक आहे! मला भेकड भूतकाळाच्या भव्य मिशा ओढायच्या आहेत ! मी नामर्द नाही ! . ."

माझ्याबरोबर चाललेला वसंता एकाएकी बोलू लागला.प्रथम मला वाटलें वसंता काहीतरी गंमत करीत असावा, म्हणून मी थोडासा हसलोंहि. पण माझें हास्य माझ्या मनांतच जिरून गेले. वसंताच्या डोळ्यात मघाची ती विचित्र लकाकी पुन्हा खेळू लागली होती. त्याच्या तोंडावर काही विचित्र भाव खेळू लागले होते. त्या भावाचे मला नीटसें वर्णन करता यावयाचे नाही. परंतु कोठली तरी वैफल्याची भावना, कसली तरी चीड, कसल्या तरी कैफ, ह्या साऱ्याचें विचित्र मिश्रण त्याच्या चेहेऱ्यावर दिसत होते. त्याचा चेहरा जरा भयानक दिसत होता. मी किंचित् काळजीच्या स्वरात त्याला म्हणालों, " वसता, उगाच कांहीतरी काय बडबडतोस ? "

" ह्या यंत्रयुगाने माणसाला लबा केला आहे. डाफरून, टवकारून, टरटरां फाडून टाकले आहे ! हे लिवलिवणारे, कोकलणारे, कुस्करलेले जंतु- " वसंता बोलू लागला. पण त्याला मध्येच अडवून मी म्हणालो, " वसंता उगाच काहीतरी काय बडबडतोस ? आपण धबधबा पाहायला निघालो आहोंत ना ? तो बघ, तो धबधब्याचा आवाजदेखील ऐकू येऊं लागला ! "

" आवाज ! – आवाज ! – धबधब्याचा आवाज ! – हिरवा पिवळा – बहिरा पागळा आवाज–मजुळ आवाज–शालनचा मंजुळ आवाज ! शालनचे नितंब डुचमळताहेत – मला आव्हान देताहेत – साऱ्या जगाला आव्हान देताहेत ! विजिगीषु वृक्षांनी अर्थपूर्ण मौन धारण केले आहे आणि मूर्ख डोगर खदखदा हसत आहेत ! शालनचा झंपर खालपर्यंत आलेला आहे – त्याचा गळा जें दाखवीत आहे आणि जे दिसावें अशी आतुरता निर्माण करीत आहे, आणि जे दिसू नये म्हणून हालचाल करीत आहे. तिच्या डोळ्याच्या चोचीची उपडी उघडमीट चालली आहे ! आणि आपली उरली सुरली पिसे तो साफसूफ करीत आहे ! "

" वसंता तू शुद्धीवर आहेस ना ? " मी किंचित् भेदरलेल्या स्वरांत विचारलें.

" शुद्ध आणि – अशुद्ध ! मी अशुद्ध आहें – सारें जग अशुद्ध आहे. मला

माझी भयंकर दया येत आहे. माझ्या आत्म्यांतून ठिबकणाऱ्या लाचार जिव्हाळ्यांत सारा मार्ग थिजून गेला आहे ! तो प्रभाकर षंढ आहे ! जगांतले सारे नवरे षंढ आहेत ! . . . . "

वसंताची वटवट चालूच होती. वसंता गंमत करीत नव्हता हें तर निश्चितच ? त्याच्यासारख्या गंभीर प्रवृत्तीचा माणूस इतका वेळ सारखी गंमत करीत राहणें केवळ अशक्य होतें. त्याला काय झालें आहे हेच मला कळेना.वात झाल्याप्रमाणे तो अर्थशून्य बडबड करीत होता. अचकट विचकट–अश्लील बोलत होता. स्वप्नातल्याप्रमाणे त्याचें बोलणें असबद्ध होतें. त्याच्या चेहऱ्यावरील चिडीचा, कडवटपणाचा भाव क्षणाक्षणाला वाढतच चालला होता. त्याच्या डोळयांतील चमक क्षणोक्षणी उग्रतरच होत चाललेली होती.

मी गोंधळून गेलों. काय करावें हें मला कळेना. प्रभाकरला बोलवावें असा विचार मनांत येऊन मी प्रभाकरकडे पाहिलें. याच वेळी शालनने आपला रुमाल नाकाला लावला होता. त्याबरोबर वसंता म्हणाला, " मला वाटते तो शालनचा रुमाल व्हावे आणि तिच्या आव्हान देणाऱ्या नाकाशी झोंबी घ्यावी. रुमाल हा परमेश्वर आहे. मला वाटते टुवाल व्हावे आणि शालनने आपला उरोभाग पुसून झाल्यावर त्या टुवालाचा चोळामोळा करून फेकून द्यावे ! रुमाल व्हावें, परमेश्वर व्हावें, टुवाल व्हावे आणि हे मादक भर्जरी सुख लुटावें! तिच्या उन्नत अंगप्रत्यंगाकडे नेत्रानी व वखवखलेल्या नजरेने पाहावें– त्या भुरक्या करड्या रंगाच्या सुखात डुचमळावें ! त्या सुखाने गुदमरावे ! . . . . "

" वसंता ! वसंता ! " मी ओरडलो, " काय झालंय् तुला ? अस भलतं सलतं तू काय बडबडतोस ? "

" माझ्या वृत्ती चेकाळून उठल्या आहेत ! " वसंताने आपली बडबड चालूच ठेवली, " माझ्या भावनांचा डोब पेटलेला आहे ! माझ्या शरीरांतील कणनकण कोकलतो आहे-विवळतो आहे ! माझ्या शरीरांतील प्रत्येक कणाचें हेंच आक्रंदन आहे ! हुळहुळणाऱ्या केसाची ती छानदार कुत्री आहे ! आणि तुम्ही दोन मरतुकडी कुत्री आहांत. माझ्या प्रेमाची कुत्र्याची तंगडी मी शालनच्या डोसक्यात घालणार. तिला बेहोश करणार — "

ऊन रखरखलें होतें. अंगांतून घामाच्या धारा वाहात होत्या आणि वसंताची भयानक बडबड चालूच होती. तो एकसारखा शालनकडे पाहात होता. आजूबाजूला येवढें सष्टिसौंदर्य होतें, पण शालनखेरीज त्याचें दुसऱ्या कशाकडे लक्ष नव्हते. तो सारखा शालनकडे एकटक पाहात होता ! जणू शालनखेरीज—स्त्रीखेरीज—कामवासनेखेरीज ह्या जगांत दुसरें कांहीच नव्हतें.

त्याच्या वटवटीला मी कंटाळलों होतों. माझ्या जागी त्याला न ओळखणारा दुसरा कोणी असता तर हॉस्पिटलांतून पळून आलेला हा एखादा वेडाच आहे असे त्याला वसंताकडे पाहून वाटलें असतें. काय करावें हें मला कळेना. म्हणून मी प्रभाकरला हाक मारली. त्याच्याबरोबर शालनहि आली.

" तू षंढ आहेस ! " वसता प्रभाकरला म्हणाला, " शालनचा मादक उरोज तुला आव्हान देतो आहे तरी तू षंढासारखा तिच्याबरोबर बुळबुळीत गप्पा मारीत चालला आहेस ! . . . . "

" वसता, काय बोलतोस रे हें ? " प्रभाकरने आश्चर्याने नि किंचित् रागाने विचारले.

" त्याला काय झालंय् कोणास ठाऊक ! " मी म्हणालों, " मघापासनं असच कांहीतरी विचित्र बडबडतो आहे तो ? "

" तुम्ही यंत्रयुगाचे बळी आहात ! क्षुद्र जंतु आहांत—गांडुळ आहांत— "

वसंताकडे भीतीमुळ विस्फारलेल्या डोळचानी शालन पाहात होती. ती म्हणाली, " ह्यांना सनस्ट्रोक तर झालेला नाही ना ? डॉक्टर म्हणाले होते, ह्या उन्हामुळे सनस्ट्रोक होण्याची भीति असते म्हणून ! "

वसता तिच्याकडे एखाद्या काळचा भुरक्या लांडग्याने पिवळचा मेंढराकडे पाहावें त्या काळचा दृष्टीने पाहात राहिला. मग तो म्हणाला, " तुझ्या मनोवृत्तीना भीतीची खमंग फोडणी उत्तेजित करीत आहे ! किती भयंकर ! किती छान ! शालन, मी तुला कवटाळीन. तुला जपीन. माझ्या उदात्तपणाचें मला कौतुक वाटतें. त्यागाच्या आडव्यातिडव्या कल्पना माझ्या मनांत गुचमळत आहेत. "

येवढें बोलून वसंता एकदम पिसाटासारखा शालनच्या अंगावर धावून गेला आणि त्याने तिला आपल्या बाहुपाशांत घट्ट कवटाळली. तो ओरडू लागला,

" मी जगाला कसलें तरी आव्हान देतों आहें ! मी जगाला धक्के देतों आहें ! जगाला आग लावतों आहें ! मी ह्या षंढ नामर्द जगाला तडे पाडतों आहें ! – मला माझी भयंकर दया वाटते आहे ! मला माझा अभिमान वाटतो आहे; माझ्या मनांत अर्थशून्य वादळें निर्माण होत आहेत ! संसारांत कोंडलेल्या साऱ्या नामर्द स्त्रियांना मोकळें करावें आणि क्षुब्ध, उदात्त, विकृत, नीच अशा कामवासनेचा डोब पेटवून द्यावा. कणाकणाने साखर गोळा करणाऱ्या यांत्रिक डोंगळ्याना चाबकाने फोडून काढावें, त्यांच्यावर बंदुकीच्या गोळ्या झाडाव्या ! अर्धेकच्चे मांस खावे ! दुसऱ्याला लुबाडावें ! स्त्रीला कवटाळावें. जगांतल्या साऱ्या नवऱ्यांच्या स्त्रियांना कवटाळावें व त्यांच्याकरता लढावें ! साऱ्या नवऱ्यांच्या मृत मूर्ख शरीरावरून स्त्रियांना टराटरां ओढीत न्यावें. त्याचे मोकळे केस कुस्करावे – "

वसंताची बडबड आणखी किती वेळ चालली असती कोणास ठाऊक ! शालन किकाळ्या मारीत होती आणि तिच्या त्या किकाळ्यांत त्याची पुष्कळशी बडबड बुडून जात होती. प्रभाकर एकदम पुढे झाला आणि वसंताने जगांतील साऱ्या नवऱ्यांना मारण्यापूर्वींच त्याने वसंताच्या थोबाडीत भडकावून दिली. त्या धक्क्याने वसताच्या डोक्यावरची हॅट दूर उडून गेली आणि वसंता कोलमडून खाली पडला.

आपल्या तोंडातून रक्त येते आहे की काय हे पाहात वसंता उभा राहिला. मग त्याने आपले धुळीने माखलेले कपडे साफसूफ केले आणि आश्चर्याच्या स्वरांत त्याने विचारले, " मी चालता चालता पडलों वाटत ! "

" तू पडला नाहीस, प्रभाकरनं तुझ्या मुस्कटात मारून तुला खालीं लोळवलं ! " मी कठोर स्वरात म्हणालो.

" प्रभाकरनं माझ्या थोबाडीत दिली ? का ? " वसंताने विचारले.

" कां म्हणून विचारतोस आणखी निर्लज्जासारखा ? " प्रभाकर म्हणाला. " दोनच मिनिटांपूर्वी तू काय करीत होतास, काय बडबडत होतास, हे काय तुला ठाऊक नाही ? "

" तू शालनला धरलं होतंस—वसंता, तू असं कांही करशील असं स्वप्नांतहि वाटलं नव्हतं ! " मी म्हणालों.

" स्वप्न ! " वसंता म्हणाला, " होय, असं कांहीतरी विचित्र स्वप्न पडल्यासारखं मला वाटलं खरं ! "

" स्वप्न नव्हे गाढवा ! " प्रभाकर म्हणाला, " तू खरोखरीच मूर्खासारखं वागलास ! "

हा सारा प्रकार काय आहे मला कांहीच कळेना. केव्हा वसंता अगदी शहाण्यासारखा बोलतो काय नि एकदम अंगात आल्यासारखें बडबडू लागतो काय ? सारेच विचित्र होते. मी म्हणालों, " बरं, आता ह्या झाडाखाली थोडी विश्रांति घेऊं या. थोडं काही खाऊन घेऊं या. "

माझी कल्पना सर्वांना आवडली. वसंताने जाऊन आपली मातीत लोळणारी हॅट आणली आणि एका मोठ्या झाडाच्या शीतल छायेखाली बसून आम्ही फराळ करूं लागलों.

फराळ करतांना मी वसंतावर बारीक नजर ठेवली होती. पण त्याची आताची वागणूक अगदी पूर्वीसारखी होती. दहाच मिनिटापूर्वी ह्या माणसाने एवढा तमाशा केला होता ह्याची कोणाला कल्पनाहि आली नसती. आपण थोड्याच वेळापूर्वीं कांही वेडेचार केले ह्याची त्यालाहि काही जाणीव असल्यासारखी दिसत नव्हती. शालनचा आपण काहीच अपराध केलेला नाही अशा रीतीने तो शालनशी वागत होता. त्याच्या ह्या वागणुकीने मी तर दिङ्मूढच होऊन गेलो होतो.

फराळ आटोपून आणि थोडी विश्रांति घेऊन आम्ही धबधब्याचा रस्ता आक्रमू लागलो. ऊन चांगलेच रखरखले होते. शालनने आपली छत्री उघडून डोक्यावर धरली होती.मी आणि प्रभाकरने डोक्यावर हॅटी ठेवल्या होत्या. वसंता मात्र हॅट हातांत घेऊन गुपचूप चालला होता.

" वसंता, हॅट घाल ना डोक्यांत. " मी म्हणालो. " खूपच ऊन आहे ! "

" नको ! ती हॅट डोक्यावर ठेवली की कांही विचित्रच वाटतं. " वसंता म्हणाला, " डोक्याला अगदी आवळ होते ती ! "

त्याने हॅट घातली नाही तर उन्हाचा परिणाम होऊन तो आणखी कांही प्रकार करायचा, ह्या भीतीने मी त्याला हॅट घालण्याचा आणखी थोडा आग्रह केला. परंतु त्याने डोक्यांत हॅट घातली नाही.

लवकरच आम्ही एक छोटासा डोंगर चढून धबधब्याजवळ आलों. साधारण तीसएक फूट उंचीच्या कड्यावरून एक चागला जाड पाण्याचा प्रवाह उडी घेत होता. हवेंत तुषार उडत होते आणि अनेक इंद्रधनुष्ये दिसत होती. जेथे पाणी पडत होते, तेथे एक मोठा भोवरा झालेला होता. आणि कानठाळ्या बसविणारा आवाज सतत कानांवर येऊन पडत होता.

डोगरावर वाराहि चागला जोराचा सुटला होता. डोक्यावर हॅटस् ठेवता ठेवतां माझी आणि प्रभाकरची पचाईत होत होती. आपली छत्री उघडी ठेवतां ठेवतां तर शालनची अगदीच तिरपीट उडत होती. वसंता बोडखाच होता आणि वाऱ्याच्या झोताबरोबर त्याच्या डोक्यावरील लाब केसाच्या बटा उडत होत्या.

थोडा वेळ धबधब्याची शोभा पाहून मी वसंताला म्हणालो, " वसंता, डोक्यात हॅट घाल पाहूं. ऊन किती कडक पडलं आहे ! "

वसंता हॅट घालण्यास तितकासा उत्सुक दिसला नाही. तेव्हा जरा दम भरल्यासारखे करूनच मीं त्याला हॅट घालण्यास सांगितले. हो. वसताला उन्हाचा मार बसून मघाच्या प्रसंगाची पुनरावृत्ती व्हावयाला नको होती.

परतु माझ्या सूचनेचा काहीच उपयोग झाला नाही. मी ज्याला भीत होतो ते अखेरला झालेच ! वसंताने बगलेत धरलेली हॅट काढून डोक्यावर ठेवली मात्र, तो एकदम बोलू लागला, " हे सारे निराळेच जग आहे. ह्या जगात एकसारखा हिरवा चिरूट ओढणारा एक डिटेक्टिव आहे. काळेनिळे पोशाख घातलेले वेटर पुन्हा पुन्हा सलाम करीत ऐटबाज लाचारी दाखवीत आहेत. रक्ताच्या थारोळ्यात एक भेकड प्रेत पडलेले आहे. आणि केस सोडलेली शालन ते रक्त चाटीत आहे. . . . मी ओरडून सागतो—आक्रंदून सागतो—हे जग अजिबात निराळे आहे. हे जग खोटे आहे— फक्त तो हिरवा चिरूट आणि ते डाफरलेले वेटर तेवढे खरे आहेत— "

बोलता बोलतां वसंताचा आवाज चढू लागला होता. त्याच्या डोळ्यांत ती मघाची चमक अधिकाधिक गडद होऊं लागली होती. त्याला त्वेष चढलेला होता. दोन्ही हातांनी हातवारे करीत तो बोलत होता.

" अरे यशवंत–यशवंत– " मला पाठीमागून हाक ऐकू आली म्हणून मीं मागे वळून पाहिलें. पाहातों तो घामाघूम झालेले डॉक्टर हातांत एक हॅट घेऊन धावतपळत येत होते. वसंताच्या अशा परिस्थितीत डॉक्टर आलेले पाहून मलाहि जरा बरें वाटले.

" यशवंत–हॅट ! ती हॅट ! " डॉक्टर सारखे ओरडत आणि हातवारे करीत डोंगराची चढण शक्य तेवढ्या गडबडीने चढत होते. मला त्यांचे शब्द अस्पष्टसे ऐकू येत होते, परंतु ते असे 'हॅट हॅट' करून ओरडत कां होते आणि त्यांनी एवढे धडपडत येण्याचें कारण काय असावें, हे मला कळत नव्हते.

" यशवंता–हॅट–वसंताची हॅट– " जरा जवळ आल्यावर डॉक्टरांचे शब्द मला स्पष्ट ऐकू आले. मी वळून वसंताकडे पाहिले. वसंता हातवारे करीत त्वेषाने बडबडत होता. जगांतल्या साऱ्या नवऱ्यांना तो पुन्हा आव्हान देऊं लागला होता. मी त्याच्या हॅटकडे पाहिले. वाऱ्याने सरकत सरकत ती अगदी त्याच्या डोक्यावरून पडायला आली होती. आपले व्याख्यान चालू असतांना मधून-मधून वसंता हॅट सारखी करण्याचा प्रयत्न करीत होता.

" ती हॅट–काढून घे लवकर– " आता आणखी जवळ आलेल्या डॉक्टरांचे शब्द मला ऐकू आले. मी वसंताच्या डोक्यावरची हॅट काढून घेण्याकरता जरा पुढे सरकलों. पण येवढ्यात सोसाट्याच्या वाऱ्याची एक झुळुक आली आणि माझा हात हॅटवर पडण्यापूर्वींच हॅटने वाऱ्यावर उड्डाण सुरू केलें.

हॅट वसंताच्या डोक्यावरून जी उडाली ती एकदम गिरक्या घेत खालच्या पाण्याच्या भोवऱ्यांत जाऊन पडली. तिने एकदोन प्रदक्षिणा घातल्या आणि मग ती अदृश्य झाली.

" घात झाला ! " कपाळावर हात मारून घेत एकदम डॉक्टर म्हणाले.

" कां ? काय झालं ? " वसंताने नेहमीच्या स्वरांत आश्चर्याने विचारले.

" ती हॅट गेली ! " डॉक्टर म्हणाले.

" गेली तर जाऊं द्या ! " वसंता म्हणाला, " नाहीतरी जुनीच होती ती ! "

वसंताच्या या शहाणपणाच्या वागणुकीकडे मी आता आश्चर्याने आणि कौतुकाने पाहात होतों.

" पण ती तुमची हॅट नव्हती ! " डॉक्टर वसंताला एक जुनाट हॅट देत म्हणाले, " ही पहा तुमची हॅट ! "

वसंताने हॅट हातांत घेतली आणि तिच्यावरून नजर फिरवीत तो म्हणाला, " खरंच की ! ही माझी हॅट आहे ! म्हणजे पहाटेच्या अंधारात मी भलतीच हॅट घेऊन आलो होतो तर ! "

" पण डॉक्टर, वसताची हॅट बदलली असली तरी त्याची हॅट घेऊन धावत पळत यायची एवढी कांही जरूर नव्हती ! " मी म्हणालों.

" त्या हॅटीत एक अद्‌भुत गुण होता, " डॉक्टर म्हणाले, " तुम्हांला त्याचा अनुभव आलाच असेल ! "

" होय ! चांगलाच अनुभव आला ! " मी आश्चर्याने म्हणालों, " असा काय गुण होता त्या हॅटीत ? "

" ती हॅट एका नवकथाकाराची होती. " डॉक्टर म्हणाले, " मागे माझ्याकडे एक नवकथाकार पाहुणा म्हणून आला होता. जाताना तो ही हॅट विसरून गेला. नवकथाकाराच्या डोक्यांत सतत राहून ह्या हॅटीला एक विचित्र गुण प्राप्त झाला होता. एखाद्याच्या डोक्यावर तिला ठेवलं की त्या माणसाचं अतर्मन एकदम जोरांत काम करूं लागे. माणसाच्या प्रकटमनाला दाबून टाकून त्याचं अंतर्मन बाहेर येई–मला या हॅटचा मानसिक रोग्यांच निदान करतांना पुष्कळच उपयोग होई ! "

एवढें बोलून खालच्या भोवऱ्याकडे डॉक्टर विषण्ण नजरेने पाहात राहिले.



# डॉ. अ. वा. वर्टी यांचीं पुस्तकें.

: लघुकथा :

मुमताज

रुपेरी स्वप्न

नवा देव



: विनोदी कथा :

दंतकथा

टालडुप्पो वाँगिमाडूऽऽ

सुलूचा सव्हंट



: कादंबरी :

अभिनय

नवा धर्म



: नाटक :

राणीचा बाग

तिसरी इच्छा ! (एकांकिका)



: लघुनिबंध :

पिसारा

